# श्रेयःसाधन.

हें पुस्तक

सुप्रसिद्ध अमेरिकन ग्रंथकार

जेम्स ॲलन

यांच्या

**ट्रायंफन्ट लाइफ**

या इंग्रजी पुस्तकाच्या आधारें

**रामचंद्र कृष्ण चौकर,**

वकील, दापोली

यांनीं लिहिलें.



प्रकाशकः—

मनोरंजन छापखान्याचे मालक,

गिरगांव-मुंबई.



किंमत ०-६-०. ]  [ १९१५.

## अर्पणपत्र.

तीर्थस्वरूप रा.रा. विनायकराव ऊर्फ भाऊ साहेब चौकर, वकील, डिस्ट्रिक्ट कोर्ट अहमदनगर, यांचे सेवेसीं—हा छोटा ग्रंथ त्यांच्याच कृपेचें फळ ह्मणून अत्यंत नम्रता व आदरपूर्वक कर-द्वय जोडून अर्पण केला असे.

रामचंद्र कृष्ण चौकर.

# श्रेयःसाधन.

## प्रास्ताविक दोन शब्द.

**एतावज्जन्मसाफल्यं देहिनामिह देहिषु ।**
**प्राणैरर्थैर्धिया वाचा श्रेय एवाचरेत्सदा ॥**

मनुष्यप्राण्यांनीं प्राण, धन, मन यांहींकरून नेहमीं श्रेयःसाधन करावें–दुसऱ्याचें बरें करावें–एवढेंच त्यांचें जन्मसाफल्य आहे, हीच त्यांची इतिकर्तव्यता आहे, असें व्यासमहर्षींनीं ह्मणून ठेविलें आहे. हा मार्ग मोठा बिकट आहे. आत्महित हें प्रधान मानलें जातें. **'आधिं पोटोबा आणि मग विठोबा'**–आत्मभावांतून मनुष्य सुटेल, तरच तो दुसऱ्याकडे लक्ष्य पोहोंचवील. तरीसुद्धां मनुष्यमात्र दुसऱ्याच्या उपयोगी प्रडावें, परहित साधावें,अशाबद्दल शक्य तेवढा प्रयत्न करीत असतो. स्वार्थ सोडून केवळ परार्थासाठीं झटणारांनां साधुकोटींतच घालतां येतें; परंतु खरा स्वार्थ–आत्मोद्धार–लोक करून घेतात काय ? क्षणभंगुर गोष्टींच्या प्राप्त्यर्थ लाचावलेले मनुष्य-प्राणि 'स्वार्थ स्वार्थ' ह्मणतात; परंतु त्याच्या लाक्षणिक अर्थानें स्वार्थ साधणारे कितीसे आहेत !

मनोरंजन व्हावें आणि चांगल्या ग्रंथकाराच्या कृतीचा परिचय व्हावा, या हेतूनें अमेरिकन ग्रंथकार **जेम्स ॲलन**' यांचें'**ट्रायंफन्ट लाइफ**' हें पुस्तक आह्मी वाचूं लागलों, तों त्यांत सर्व भगवद्गीता ओतप्रोत भरलेली दिसूं लागली. भगद्गीतेंतील प्रमेयांबाहेर त्यांत कांहीं नाहीं. तथापि केवळ भगवद्गीता सांगण्याचा साहेबमहसूबांचा हेतु नसावा असें वाटून केवळ व्यवहारांतील प्रमेयांनां उच्च मनोवृत्तीची

कसोटी लावून पहावी अशा हेतूनेंच साहेबांनीं तो ग्रंथ लिहिला आहे—नव्हे, तसें त्याला स्वरूप दिलें तर तें अधिक ग्राह्य होईल, असें वाटून अगदीं साध्या भाषेंत फारसे उतारे अगर दुर्बोध अवतरणें न घालतां सदरहू भाषांतर फुरसतीच्या वेळांत तयार करून वाचकांस सादर करीत आहों.

हल्लीं शिक्षणक्रमांत नैतिक शिक्षणाचा समावेश करावा, असा प्रयत्न चालू आहे. आणि केवळ एकाच धर्माच्या नीतितत्त्वांचा, धार्मिक मतें ह्मणून उहापोह केलेला अन्यधर्मीयांनां खपणार नाहीं, हा त्यावर आक्षेप येईल. तसा आक्षेप न यावा, त्रिकालाबाधित नीतितत्त्वें, सदाचाराचे नियम, सर्वकाल सर्वधर्मीयांस सारखेच आहेत असें समजून कोणच्याहि धर्माच्या मनुष्याला यांत कांहीं तरी घेण्यासारखें सांपडेल, अशी उमेद धरून हें पुस्तक लिहिलेलें आहे. विचारसरणी उपरिनिर्दिष्ट साहेबांची आहे. वेडीवांकडी भाषा आमची आहे. मूळ ग्रंथ फार बहारीचा आणि सूत्रमय असून अगदीं सोपा आहे. प्रत्येक तत्त्व अगदीं तंतोतंत मनाला पटण्यासारखें आहे. अशा उपयुक्त ग्रंथाचा परिचय आपणांला व्हावा, याच हेतूनें तो मराठींत उतरला आहे. यांत भाषेची सेवा केल्याचें श्रेय आह्मी घेऊं इच्छित नाहीं.

तथापि यांतील एकादें सूत्रमय वाक्य जरी, गलितधैर्य झालेल्या एकाद्या हताश प्राण्याला प्रसंगीं उत्साहदायक झालें, तरी आह्मांला झालेल्या आनंदाचे वांटेकरी आणखी दुसरे लोक आहेत असें समजून आमचा आनंद द्विगुणित होईल.

दापोली,
३१ जुलै १९१५. } **रामचंद्र कृष्ण चौकर,**

# श्रेयःसाधन.

## भक्ति आणि धैर्य.

जे लोक प्रत्येक प्रसंगाला धैर्यानें तोंड देतात, खचून जात नाहींत, त्यांनांच आयुष्यांतील संकटांमध्यें यशःप्राप्ति होते, तेच संकटां-तून वटावून जातात. आह्मी हीच गोष्ट मुद्दाम पहिल्यानें सांगितली आहे याचा हेतु इतकाच, कीं, त्यांत बीजरूप असलेल्या सिद्धांताला केव्हांहि अपवाद नाहीं, अशी वाचकांची पूर्ण खात्री व्हावी. व्यवहारांतील सदाचार अगर सच्छील वर्तन यांत कोणच्या मुख्य तत्त्वांचा अंतर्भाव होतो, आणि नेहमीं समाधानवृत्तीनें राहिलें असतां आंगीं धैर्य कसें बाणतें, व त्यामुळें उत्कट श्रेयःसाधन कसें करितां येतें, याचें दिग्दर्शन आम्ही पुढील विवेचनांत करणार आहों.

सरळ मार्गानें चालून सत्यान्वेषण करीत असावें, पुष्कळ टक्के-टोणपे खाऊन व संकटें सोसून ज्ञान संपादावें, तसेंच कसाहि प्रसंग आला तरी दुर्मुख व हतवीर्य होऊन न जातां मनोविकाररूपी अंतस्थ शत्रु जिंकावे, व जीवितार्चे सार्थक करावें–श्रेयःसाधन करावें–हीच मनुष्याची इतिकर्तव्यता आहे. हेंच आयुष्याचें उच्चतम ध्येय असावें, आणि असाच आजपर्यंतचे सर्व साधुसंत, परमेश्वराचे अवतार आणि द्रष्टे आपणांला सांगत आले आहेत. हल्लींच्या काळीं या ध्येयप्राप्तीपर्यंत जाणारे लोक फार थोडे आहेत. सर्वांची या ध्येय-

प्राप्त्यर्थ धडपड चालू आहे, तथापि कांहीं थोडे पुण्यश्लोक मात्र त्या पदवीप्रत पोहोंचतात. अशा महात्म्यांचीं स्फूर्तिदायक चरित्रें आपणांला अवगत आहेत, व त्यांची संख्या मनुष्यांच्या कल्याणाकरितां प्रत्येक युगांत वाढत आहे. सर्व मनुष्यें या आयुष्यरूपी शाळेंतील विद्यार्थी होत. कैक या विद्यार्थिदशेंतच राम ह्मणतात; परंतु त्यांत कांहीं असेहि निघतात, कीं, दृढनिश्चयानें अज्ञान, दुःख व संकटें यांच्यांशीं झगडून आयुष्याची इतिकर्तव्यता काय, याचें सम्यक् ज्ञान प्राप्त करून घेतात, व लीलेनें या विद्यार्थिदशेंतून पार पडतात. या विश्वाच्या विस्तृत पाठशाळेंत मनुष्यानें आजन्म विद्यार्थिदशेंत राहून मूर्खपणा आणि वर्तनांत होणाऱ्या चुका यांसाठीं फटके खावे, असाच केवळ परमेश्वराचा हेतु नाहीं. मनुष्याला इच्छा मात्र पाहिजे, ह्मणजे त्याला आपलें मन दृढनिश्चयानें इतिकर्तव्यतेकडे लावतां येईल. अनुभवानें त्याला चातुर्य व ज्ञान प्राप्त होईल, आत्मविश्वासानें अज्ञान व दुःख यांचा नाश करितां येईल, आणि एकंदरींत शांतिसुख मिळून त्याला सर्वोत्तम होतां येईल, नव्हे हें केवळ मनुष्याच्याच हातीं आहे. "**नर जब करनी करे तो नरका नारायन हो जाय !**"

आपल्या आयुष्यांत दृढमूल झालेलीं व अतिशय कष्टदायक अशीं संकटें पाठीला लागलेलीं असतात; परंतु त्यांच्या मूलांकुरांचा छडा काढून त्यांचा समूळ उच्छेद केला पाहिजे. षड्रिपु, कर्मेंद्रियें आणि वासना यांचा शमदमादिकांनीं निरोध केला नाहीं, तर तीं प्रबळ होऊन दुःखदायक होतात. परंतु त्यांचें नियमन केलें असतां त्यांच्यापासून उत्तम फलप्राप्ति करून घेतां येते. आयुष्यांतील संकटें भयंकर, खटाटोप मोठा, आणि साध्य अनिश्चित असतें, व त्याच्या चिंतेमुळें हजारों स्त्रीपुरुषांचा चुराडा उडालेला आपण

पाहतों; परंतु ही संकटपरंपरा केवळ भासमय आहे, काल्पिनक आहे व तिचा प्रतिकारहि करितां येण्यासारखा आहे. जगांत 'स्वयंसिद्ध' आणि चिरकालीन असें दुःख नाहीं, आणि मनाला दुःखाचा संसर्गहि बाधणार नाहीं, अशी स्थिति प्राप्त करून घेतां येण्यासारखी आहे. परमेश्वराच्या अक्षय व सार्वलौकिक न्यायावर दृढविश्वास, आणि सर्व जीवजातांचें कल्याण करावें अशी पूर्ण भावना ठेवणें, हीच शाश्वतसुखाची गुरुकिल्ली आहे. ज्याला आपण धैर्यवान, गंभीर व दृढनिश्चयी व्हावें अशी आकांक्षा असेल, त्यानें आरंभींच, जगाचें कल्याण करणें हेंच आपल्या आयुष्याचें मुख्य रहस्य आहे, असा पूर्ण विश्वास धरिला पाहिजे. जगांतील सर्व व्यवहारांकडे लक्ष्य ठेवून ज्याला मोक्षप्राप्तीचा आनंद मिळवावयाचा असेल, त्यानें हें पूर्ण लक्ष्यांत ठेवावें, कीं, या जगांत दुःख ह्मणून निराळें कांहीं नसून आपल्या कृतींचेंच तें फळ होय. परंतु मनुष्याचें मन इतकें दुर्बळ असतें, कीं, मनुष्य आपला स्वतःचा कैवार घेऊन आपल्या कृतींचें समर्थन करीत असतो, व आपल्या दुःखाचें कारण अन्य आहे असें ह्मणतो. या समजुतीमुळें आपल्या दुःखाचें मूळ आपणच आहों, याचें ज्ञान त्याला होत नाहीं; परंतु कालेंकरून '**स्वकर्मसूत्रग्रथितो हि लोकः**' ही गोष्ट त्याला समजण्यासारखी आहे. अथवा ज्याला जीविताचें साफल्य व्हावें अशी इच्छा असेल, त्यानें तिचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. या गोष्टीवर पहिल्यानें विश्वास बसला पाहिजे, व त्याची खात्री पटून अनुभव आला ह्मणजे तो कायम टिकला पाहिजे.

प्रारब्धभोग अथवा परमेश्वर आपली कसोटी पाहण्याकरितांच दुःखें अनुभविण्याला लावितो, या दृष्टीनें संकटांकडे पाहिलें ह्मणजे त्यांची तीव्रता कमी भासूं लागते, आणि ज्याचो परमेश्वराच्या

ठिकाणीं निष्ठा आहे तो याच दृष्टीनें संकटांची मीमांसा लावितो ज्ञानी मनुष्य सर्व दुःखांतून पार पडतो, आणि अनुभवानें सर्व दुःखाचें बीज कशांत आहे, याचा त्याला उलगडा होत जातो, व याच अनुभवजन्य ज्ञानामुळें मनुष्याचें शील उत्तम बनत जाऊन संकटांतून ज्ञानी मनुष्य आपली उन्नतीच करून घेतो.

परमेश्वराची भक्ति हा अरुणोदय, व पुढें ज्ञान होणें हा सूर्योदय, अशी सांखळी आहे. ईश्वरभक्तिखेरीज मनुष्याला धैर्य प्राप्त व्हावयाचें नाहीं, किंवा अंतःकरणाला शाश्वत शांति मिळावयाची नाहीं. संकटें आलीं असतां भगवद्भक्त डगमगून जाणार नाहीं, किंवा निराश होणार नाहीं. समोरचा मार्ग कितीहि भयानक अगर संकटमय दिसला, तरी त्याच्या पलीकडे उज्वल आनंद, शाश्वत सुख व पूर्ण ज्ञान यांचें धाम असून तें आपल्या हातीं येणार, अशी श्रद्धावान् मनुष्याची निष्ठा असते.

ज्याला सदाचरणाचा विजय होईल असा प्रत्यय नसतो, तो यःकश्चित् संकटांनीं अगदीं गर्भगळित होऊन जातो. कारण उघडच आहे. ज्याच्या हातून सदाचरण होत नाहीं, त्याच्या हातून दुराचरणाशिवाय काय होणार? एकदां सर्व जग दुःखपूर्ण आहे अशी एकाद्या मनुष्याची भावना झाल्यास त्याच्या वांट्याला दुःखाशिवाय काय येणार आहे? असे पुष्कळ लोक आपल्या दृष्टीला पडतात, कीं, संसारांत त्यांना अपेश आल्यामुळें इतरांकडून त्यांना जो उपसर्ग पोहोंचला असेल, त्याबद्दल मन मानेल तें ते बोलत असतात. त्यांना स्वतःला असें पक्कें वाटत असतें, आणि दुसऱ्यांनांहि आपल्यासारखेंच वाटावें अशी त्यांची अगदीं जिकीर चाललेली असते, कीं, आपल्या सभोंवतालच्या लोकांनीं जर आपणाला फसविलें नसतें तर आपण मोठे श्रीमंत आणि लोकमान्य

झालों असतों. आपल्याला दुसऱ्यांनीं कसा दगा दिला कसें फसविलें, कसा घात केला, याचा ते हजारदां पाढा वाचीत असतात. आपण स्वतः अगदीं निरुपद्रवी असून प्रामाणिकपणा आणि सुस्वभाव यांचे अगदीं मूर्तिमंत पुतळे आहों, आणि दुसरे लोक मात्र कपटी आणि मत्सरी आहेत, असा त्यांचा ठाम समज असतो. इतर लोकांप्रमाणें आपण आपस्वार्थी, मतलबी असतों तर एखाद्या फलाण्या व्यक्तीप्रमाणें आपणहि प्रसिद्ध व वैभवशाली झालों असता, असेंहि ह्मणण्याला ते मागेंपुढें पहात नाहींत. आपण विशेष स्वार्थत्यागी आहोंत, त्यामुळें आपली भरभराट न होतां पिछेहाट होते, अशीहि आढ्यता मारण्याला कांहीं लोक कमी करीत नाहींत. अशी शेखी मिरविणाऱ्या लोकांनां बरें व वाईट यांच्यामधील भेद कळावा कसा ? कारण, मनुष्यस्वभावांत किंवा एकंदर जगांत चांगलें ह्मणून कांहीं आहे, अशी त्यांची भावनाच नसते. दुसऱ्याचे दोष मात्र त्यांनां दिसतात, आणि स्वतः आपण निर्दोष आहों, परंतु विनाकारण दुःखानें गांजलों आहों, अशी ते आपली समजूत करून घेतात. स्वतःमधील दोष कबूल न करितां सर्व जगच दुष्ट आहे असें ते धरून चालतात. ते अंतर्यामीं 'पापा'ला चिकटून बसलेले असल्यामुळें सर्व जगांत दुष्कृत्यांचें साम्राज्य आहे असेंच त्यांनां वाटतें आणि जगांत ' सत् ' आणि ' असता 'चा झगडा चालला असून त्यांत ' असता'चाच विजय होत आहे, असा त्यांचा पूर्ण ग्रह झालेला असतो. स्वतःचें मौर्ख्य, अज्ञान व दुबळेपणा यांचें ज्ञान त्यांनां न झाल्यामुळें आपण दुर्दैवी आहों, व दुःख व दुर्भाग्य हेंच आपल्या नशिबीं आहे, असें ते धरून चालतात.

ज्याला ह्मणून आपलें जीवित उपयोगी व यशस्वी व्हावें, आपली आध्यात्मिक उन्नति होऊन आत्यंतिक कल्याण व्हावें असें वाटत

असेल, त्यानें हें सर्व मनोदौर्बल्य–कीं ज्यामुळें चांगलें व निष्पाप असें कांहींच दिसत नाहीं, चोहोंकडे पाप व दुराचरण भरलेलें आहे असें वाटतें,तें सर्व--घालविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अप्रामाणिक-पणा, परवंचन आणि आपस्वार्थीपणा यांनीं आपल्याला जय येईल असें ज्यांनां वाटत असेल त्यांच्या वांट्याला दारिद्य, दुःख आणि अपयश हीं ठेविलेलीं आहेत, असें समजावें. ज्याला दुसऱ्याची बरोबरी करण्यासाठीं नेहमींच आत्मवंचन करून आपले उच्चतम मनो-विकार दडपून टाकावे लागत असतील, त्याला कितीसें धैर्य आणि सुख व शांती मिळतील,याची कोणालाहि कल्पना होईल.'असत्'हें 'सत्'-पेक्षां बलवत्तर आहे, व दुष्ट मनुष्यें सुखी असतात–त्यांचा बोलबाला चाललेला असतो—असें ज्याला वाटत असेल, तो मनुष्य अजून पापात्मा आहे,व त्यामुळें त्याला कधींहि जय येणार नाहीं,व यावयाचा नाहीं, हें पक्कें समजावें. कधींकधीं असेंहि तुमच्या मनांत येईल, कीं, सर्व जग दुष्कृत्यांत अगदीं लंपट होऊन गेलेलें आहे, वाइटाचा उत्कर्ष चाललेला आहे आणि चांगल्यास कोणी पुशीत नाहीं. जगांत यदृच्छया काय चांगलें घडेल तें खरें, बाकी सर्व अन्यायाचा आणि बेबंदशाहीचा बाजार भरलेला आहे! परंतु ही भावना खरी धरून चालूं नका! वर दिसतें आहे त्याहून खरी स्थिति निराळी आहे. जग वस्तुतः आहे तसें तुह्मांला दिसत नाहीं. जगांतील घडामोडींच्या कार्यकारणसंबंधाचें अजून तुह्मांला आकलन झालेलें नाहीं; परंतु त्याबद्दल जेव्हां तुमच्या अंतःकरणांत प्रकाश पडेल, आणि तुह्मी निर्मळ अंतःकरणानें आणि शुद्ध मनानें जगाचें निरीक्षण कराल, तेव्हां ईश्वराच्या न्यायीपणाबद्दल तुमची खात्री पटेल, आणि हें रहस्य कळल्यानंतर जेव्हां तुह्मी आपल्या सुसंस्कृत दृष्टीनें जगाकडे पाहूं लागाल, तेव्हां तुह्मांला वाई-टाच्या ठिकाणीं चांगले, अस्वस्थतेच्या ठिकाणीं स्वस्थता, व अन्या-

याच्या ठिकाणीं न्याय आहे असें दिसूं लागेल. परमेश्वराच्या इच्छा-मात्रेंकरून एकदां प्रलय झाल्यानंतरच ब्रह्मांडाची उत्पत्ति झाली आहे, आतां त्यांत दुःख म्हणून राहिलेलें नाहीं. प्रलयाबरोबर सर्व दुष्ट गोष्टींचा नाश झालेला आहे, आतां वाईटाचा उत्कर्ष व्हावयाचा नाहीं. हें सुखमय स्वप्न आहे खरें, तथापि जगांत अजून पुष्कळ पाप भरलेलें आहे. तसें नसतें तर नैतिक ध्येय असावें, अशी आवश्यकता वाटलीच नसती. जगांत अजून पुष्कळ दुःख आहे व पाप आणि दुःख यांचा कार्यकारणसंबंध आहे. तसेंच जगांत पुष्कळ चांगलेंहि आहे, अविनाशी आनंद आहे, व चांगलें आणि आनंद यांचाहि कार्यकारणसंबंध आहे.

चांगल्याचा नेहमीं विजय होईल, व चांगलें हेंच अक्षय आहे, असा अंतर्यामीं विश्वास उत्पन्न होऊन तो थोड्याशा दिखाऊ अन्या-यांनीं, दुःखांनीं अगर संकटांनीं ज्याचा ढळणार नाहीं, तोच मनुष्य संशय व निराशा यांचा उच्छेद करून सर्व संकटांतून मोठ्या धैर्यानें पार पडेल. त्याला सर्वच गोष्टींत यश येईल असेंच जरी नाहीं, तथापि अपयशानें तो डगमगून न जातां नव्यानव्या उच्चतम साध्यांची आकांक्षा धरून तो आपली उन्नति करून घेईल. अप-यशानें तो हतवीर्य न होतां त्यामुळें त्याच्या स्वप्नींहि नाहींत अशीं अचाट कामें साध्य करून घेण्याला त्याला उलट नवें धैर्य येईल, आणि त्याचें आयुष्य फुकट जाणार नाहीं. आयुष्यरूपी बळकट सांखळीं-तून अपयशरूपी हे कमकुवत दुवे काढून टाकले म्हणजे बाकी सर्व जोरदार सांखळी तेवढीच राहील. अशा रीतीनें अपयश हेंहि त्याचें एक साहाय्यकर्तें होईल, व तसाच कदाचित् परमेश्वराचाहि हेतु असेल!

रणक्षेत्रावर बलाढ्य शत्रूच्या दारूगोळयाच्या असह्य माऱ्याला एकादा मनुष्य शांतपणें तोंड देईल, याला तुम्ही पशुवृत्तीचें धैर्य म्हणा

पाहिजे तर किंवा एकादा मनुष्य खवळलेल्या भयंकर क्रूर श्वापदापुढेंहि आनंदानें जाईल; परंतु तोच या संसारसागरांत अगदींच दुर्बळ आहे असें आपणाला दिसून येईल.तो अंतस्थ मनोविकाररूपी शत्रूच्या तडाक्यांत सांपडला असतां अगदीं दीन गोगलगाय बनून जाईल. रणक्षेत्रावर भयंकर संग्रामांत धैर्य धरून उभें राहण्यास जितकें सामर्थ्य लागतें, त्याहून सरस व दैवी सामर्थ्य संकटसमयीं मनाची शांतता राखण्यास जरूर असतें. दुसऱ्याला जिंकण्यापेक्षां स्वतःला जिंकण्यास मोठें धैर्य लागतें, व हेंच मनोधैर्य भक्तीचें सहचारी आहे. देवावर नुसता विश्वास ठेवून भागणार नाहीं. परमेश्वराचें आस्तित्व व त्याचें जगत्कर्तृत्व यांवर श्रद्धा असणें, हीं केवळ वरचीं साधनें आहेत. त्यांच्या योगानें मनुष्याच्या अंतर्यामावर खरा परिणाम घडलेला दिसणार नाहीं, तीं आणि खरी भक्ति उत्पन्न करूं शकत नाहींत. ईश्वराविषयीं मतें व भक्ति यांचा एकत्र सहवास असेल, परंतु तीं भक्तीहून भिन्न आहेत. ईश्वर, धर्मप्रणीत पुस्तकें आणि अवतार यांच्याबद्दल जे कांहीं ठरींव मतें मोठ्या आस्तिक्यबुद्धीनें प्रतिपादन करीत असतात, त्यांच्याच ठिकाणीं खऱ्या भक्तीची पूर्ण वाण दिसून येते. कारण, यत्किंचित् संकट प्राप्त झालें असतां ते संतापतात, देहभान विसरतात व दुःखार्णवांत बुडून जातात. एकादा मनुष्य जर यत्किंचित् अपयशामुळें क्षोभलेला, काळजीयुक्त, निराश आणि दुःखी झालेला असेल, तर तो धार्मिक असूनहि त्याची परमेश्वरावर निष्ठा नाहीं, असें ह्मणावें लागतें. ज्या ठिकाणीं भक्ति आहे त्या ठिकाणीं श्री, धृति, कीर्ति आणि विजय हीं आहेत असें समजावें. मनुष्याचीं मतें विचाराचा वारा जसा लागेल, त्याप्रमाणें बदलणारीं असतात; सबब तीं फारशीं जमेस धरतां येत नाहींत. त्यांच्यावरून वस्तुस्थितीचें खरें ज्ञान होत नाहीं. कारण त्यांच्या

उगमाचें एकच स्थान ह्मणजे मानवी हृदय हें होय. जे आपण अमुक धर्माचे लोक असें ह्मणतात, परंतु ज्यांच्या हातून यत्किंचित्‌हि चांगलें कृत्य घडत नाहीं, ते ईश्वरपराङ्मुख आहेत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. जे सत्कृत्यांत मग्न आहेत त्यांनीं आपण कोणच्याहि धर्माचे नाहीं असें ह्मटले तरी ते ईश्वरभक्त आहेत, असें समजावें. ज्यांची ईश्वरावर भक्ति नाहीं व जे देव मानीत नाहींत तेच नेहमीं दुःखी व असंतुष्ट असतात. ज्यांनां चांगल्याची कदर नाहीं व जे जन्मभर 'वाईट' उराशीं धरून बसतात, तेच खरे नास्तिक होत. ईश्वरभक्तीनें धैर्य येऊन संकटांतून निभावून जातां येतें. अपयश आलें तरी तें यशाची पायरी आहे असें मानतां येतें. भक्तीनें सहनशीलता व आघात सोसण्याचें सामर्थ्य येतें. निखिल वस्तुजातामध्यें 'सत्य' भरलेलें आहे, असा प्रत्यय येतो आणि अंतःकरण विजयी होऊन मनाची योग्यता मोठी आहे, असें समजूं लागतें.

तेव्हां, हे मानवीप्राण्या ! आपल्या अंतःकरणांत भक्तीचा दीप प्रज्वलीत कर, आणि त्याच्या योगानें संकटांच्या अंधारमय मार्गांतून पार पड. त्याचा उजेड अंधुक आहे, ज्ञानाच्या प्रकाशासारखा तो प्रखर तेजस्वी नाहीं; तथापि संशय व निराशा यांच्या धुक्यांतून तुला पार पाडण्यास तो पुरेसा आहे. आधिव्याधि, शोक, मोह, यांच्या कंटकमय मार्गांतून तो तुला निभावून नेईल. मनुष्याच्या अंतःकरणरूपी जंगलांत धुमाकूळ घालणाऱ्या मनोविकाररूपी श्वापदांनां धुडकावून लावून शुद्ध आयुष्यक्रम आणि उच्चतम ध्येय यांच्या सपाटीवर भक्तिदीप तुह्मांला आणून पोहोंचवील. इतकी तुमची तयारी झाल्यावर मग तुह्मांला प्रकाशाची गरज लागणार नाहीं. तेथें तुमच्या सर्व आधिव्याधि, लोभ, मोह, शोक, परिताप

हीं नाहींशीं होऊन तुमच्यामध्यें नवीन जागृति उत्पन्न होईल. तीमुळें श्रेष्ठ विचार, उच्चतम ध्येयें व श्रेष्ठ कर्तव्यकर्में यांचाच तुह्मांला ध्यास लागून राहील,. आणि मग प्राप्त झालेल्या ज्ञानाच्या तेजानें तुह्मी पूर्ण सुखी होऊन अक्षय शांति आणि अविनाशी आनंद यांचा यथेच्छ उपभोग घ्याल.

# पुरुषार्थ आणि सद्भाव.

मनुष्य खरोखर पुरुषार्थयुक्त असेल तरच त्याच्या ठिकाणीं सदाचरण संभवनीय आहे. तसेंच स्त्रीचेंहि आहे. खरा स्त्रीधर्म तिच्या आंगीं बिंबल्याखेरीज ती सत्वशील असणार नाहीं. आंगीं नीतिधैर्य नसेल तर खरा सद्भाव आंगीं बाणणार नाहीं. नीति आणि सद्भाव हीं एकच आहेत. मनाची क्षुब्धता, ढोंगीपणा, तोंडपुजेपणा, कांगावखोरपणा आणि हंसून वेळ मारण्याचें ढोंग, या सर्वांस मनांतून हांकलून द्या. वाईट बुद्धि जात्याच दुर्बल आणि भ्याड असून तिच्यानें तड लागावयाची नाहीं. परंतु सद्बुद्धि ही स्वतःच सबळ, परिणामकारी आणि तेजस्वी आहे. पुरुषांनीं आणि स्त्रियांनीं चांगलें बनावें असें आह्मी ह्मणतों, याचा अर्थ त्यांनीं धैर्यवान्, खुल्या दिलाचीं आणि आत्मविश्वासी व्हावें, असा आहे. आह्मी सुशीलता, सात्विकपणा आणि धिम्मेपणा आंगीं धरावा असें सांगतों, याचा अर्थ 'भ्याड' बनावें, प्रसंगीं हातपाय हालवूं नये असा आहे, असें मानणारांनां आमच्या ह्मणण्याचें रहस्य समजलें नाहीं व ते आमच्या ह्मणण्याचा विपर्यास करीत आहेत, असें आह्मी समजतों. खरा पुरुषार्थ आणि खरा स्त्रीधर्म यांची योग्य जाणीव झालेल्यांनाच या दैवी संपत्तीच्या गुणांचा अर्थ समजण्यासारखा आहे, आणि अशांनांच श्रेष्ठ आयुष्यक्रमाची ओळख होईल. ज्यांच्या नैसर्गिक मनोवृत्ति तीव्र आहेत, आणि जे शुद्धाचरणी असून मनानें उदार आहेत, आणि ज्यांची नीतिमत्ता अत्यंत श्रेष्ठ आहे, अशाच लोकांनां श्रेयःसाधन होणार आहे. तुमच्यामध्यें असलेली तामसी वृत्ति—जी तुमचें

प्रसंगीं देहभानहि विसरविते, जिच्यामुळें तुमची सात्विक वृत्ति, तुमचें पावित्र्य, तुमचें पौरुष तुह्मी विसरतां, त्याच तामसी वृत्तीचा निरोध करून तिला योग्य वळण लाविलें तर ती तुह्मांला दैवी संपत्तीचे मालक करून श्रेष्ठ पदाला पोहोंचवील, आणि तुह्मांला आयुष्याची इतिकर्तव्यता साधण्याला समर्थ करील.

तुमच्यांतील हा तमोगुणरूपी राक्षस वठणीला आणला पाहिजे. तुमच्या मनावर, तुमच्या अंतःकरणावर, तुमच्या आत्म्यावर तुमचा ताबा पाहिजे; तमोगुणाचा नको. मनुष्य उच्च मनोवृत्तीपासून च्युत होऊन जेव्हां क्षुद्र मनोवृत्तीच्या कह्यांत जातो, तेव्हां तो दुर्बल आणि क्षुद्र आहे, असें समजावें. तुमचे मनोविकार हे तुमचे दास आहेत. तुमचे स्वामी नव्हत. भृत्यांची योजना योग्य कामींच केली पाहिजे. त्यांच्यावर तुमची पूर्ण हुकमत असूं द्या, ह्मणजे ते तुमच्या कह्यांत राहून तुमच्या चांगले उपयोगीं पडतील.

तुमचें 'जीवित' निरुपयोगी नाहीं, तुमच्या शरीराचा अगर मनाचा कोणताहि अंश टाकाऊ नाहीं. सृष्टिनियमांत बिलकूल चूक होत नाहीं. सर्व जगाची उभारणी सत्याच्या पायावर आहे. तुमचे सर्व देहधर्म, मनोवृत्ति आणि इच्छाशक्ति चांगल्या आहेत, आणि त्यांचा योग्य उपयोग करणें यांतच पवित्रता, शहाणपणा आणि सर्व सुखांची गुरुकिल्ली आहे. त्यांना योग्य मार्गास न लावितां त्यांचा दुरुपयोग करणें ह्मणजे मोठें पाप व मूर्खपणा असून सर्व दुःखांचें बीजारोपण करणें होय.

मनुष्याची साधारण प्रवृत्ति दुष्ट प्रकारची—द्वेष करण्याकडे आणि जिव्हालौल्यानें तामसी आहारविहारांचा यथेच्छ उपभोग घेण्याकडे—असते, आणि त्यांत दंग होऊन त्यांचा अतिरेक झाल्यामुळें कष्ट झाले ह्मणजे 'जीवित' व्यर्थ आहे असें मनुष्यें ह्मणूं लागतात.

त्यांनीं जीविताला दोष देण्यापेक्षां स्वतःच्या स्वैर वर्तनाला दोष द्यावा, हें उत्तम. आपल्या अस्तित्वाचा हवा तसा दुरुपयोग करण्यांत चूर न होतां आपल्या 'जीविता'चा कांहीं तरी उच्च हेतु आहे असा निष्ठापूर्वक अभिमान बाळगिला पाहिजे. मनावर नेहमीं दाब ठेविला पाहिजे. उगाच क्रोध अगर उतावीळपणा यांच्या स्वाधीन न होतां क्रोध आंवरण्याकडे लक्ष्य ठेविलें पाहिजे. दुसऱ्याच्या प्रत्येक कृतीबद्दल आणि मताबद्दल जहाल न होतां सहनशीलता ठेवून अपशब्द अथवा छद्मी भाषण बोलणाऱ्या प्रतिपक्षाबरोबर उगाच वितंडवाद घालीत बसूं नये.

मनाची शांति, दुसऱ्याच्या भानगडींत न पडणें, आणि परपीडा न देणें, हींच खऱ्या मनुष्यतेचीं लक्षणें आहेत. दुसऱ्यांनां योग्य तो मान द्या, व स्वतःचा योग्य अभिमान बाळगा. आपला मार्ग आंखून ठेवून नेटानें आणि न कांचकतां त्या मार्गानें चला, आणि अव्यापारेषुव्यापार करण्याच्या भानगडींत पडूं नका. सज्जनांच्या ठिकाणीं भिन्नभिन्न गुणांचें एकत्र वास्तव्य दृष्टीला पडतें. "**वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि**"—करारी स्वभावाबरोबर मनाचा अत्यंत कोमलपणाहि सज्जनांमध्यें आढळून येतो. सज्जन आपल्या तत्त्वाचें धोरण न सोडतां इतरांशीं त्यांच्या दर्जानुरूप सौजन्यानें आणि युक्तीनें वागतात. सत्यापासून तिळप्राय च्युत होण्याची वेळ आली तर सत्य न सोडतां मृत्यु पतकरण्याइतकें कठोर मन, किंवा प्रसंगीं चुकलेल्या व दुर्बल झालेल्या शत्रूवर दया करण्याइतकी मनाची कोमलताहि, लोकोत्तर मनुष्यांमध्यें दिसून येते.

आपल्या सद्सद्विचारबुद्धीला बरें दिसेल त्याप्रमाणें वागा, आणि याप्रमाणें वागणारे जे इतर लोक असतील त्यांनां मान द्या. मग त्यांचा धर्म अगर वागणूक तुमच्या वागणुकीहून भिन्न असली तरी

हरकत नाहीं. दुसरा मनुष्य आपल्याहून भिन्न धर्माचा अगर भिन्न मताचा आहे ह्मणून त्याची कींव करण्याची जी प्रवृत्ति कांहीं लोकांत दिसून येते, ती मनुष्यपणास अगदीं न शोभण्यासारखी आहे! कोणी मनुष्य अज्ञेयवादी, निरीश्वरवादी, बौद्ध, ख्रिस्ती अगर मुसलमान असला ह्मणून त्याबद्दल आपणास खेद कां वाटावा? हा 'खेद' अगर 'कींव' अथवा 'अनुकंपा'यांस आह्मी 'तिरस्कार' हें नांव देतों. दीन, दुबळे, गांजलेले हींच कींव करण्याचीं, अनुकंपा दाखविण्याचीं योग्य स्थानें होत. कळवळा येण्याची क्रिया मला तुमची कींव येते,' एवढें ह्मणून पुरी होत नाहीं. ती पुरी होण्यास हातून मायेचें वर्तनच घडलें पाहिजे. बलिष्ठांबद्दल, आत्मविश्वासानें चालणारांबद्दल व सरळ मार्गानें चालणाऱ्या धीरोदार पुरुषांबद्दल,ह्मणजे वर ह्मटलेल्या सद्सद्विचारबुद्धीनें वागणाऱ्या लोकांबद्दल,आपल्याला कींव येते असें ह्मणणें, ह्मणजे निव्वळ थोतांड आहे! दुसऱ्याला केवळ आपोआप माझ्या मनाप्रमाणेंच वाटावें, अगर आपल्याशीं कोणीं विरोध करूं नये असें ह्मणणें हा केवळ जुलूम होय. जर माझ्या ह्मणण्याची सत्यता दुसऱ्याच्या मनाला पटली, व तें योग्य आहे असें त्याच्या निदर्शनास आलें, तर तो आपोआप माझ्या मताचा बनेल,व माझ्या कामांत मनोभावानें साह्याय्य करील. माझें काम तेंच त्याचें काम असें जरी त्यानें बोलून दाखविलें नाहीं, तथापि तो सच्चा मनुष्य आहे, सद्सद्विचारबुद्धीला धरून चालणारा आहे, एवढें पुरे आहे. माझेंच काम त्यानें केलें पाहिजे, असें नाहीं. त्याचें कर्तव्य त्यास आहेच. आत्मप्रत्यय झालेला, व स्वतःचीं चाड बाळगणारा असा विचारवंत व ज्ञानी माहात्मा, भिन्न धर्माचा असला ह्मणून काय झालें! तो सदसद्बुद्धीनें चालत असेल तर त्याच्याबद्दल यत्किंचित्हि तिरस्कार

न बाळगतां आह्मीं त्याचे पाय धरले पाहिजेत, व हींच दुसऱ्याच्या मताबद्दल सहिष्णुता होय.

या सर्व प्रमाणबद्ध जगतामध्यें आपणास जर कर्तृत्ववान् आणि आत्मज्ञानी बनावयाचें असेल, तर आपण 'मनोजय' केला पाहिजे, आणि ज्यांनीं मनोजय केला आहे त्यांनां योग्य मान दिला पाहिजे. आपणांला जर दृढनिश्चयी आणि पुरुषार्थयुक्त व्हावयाचें असेल तर आंगीं उदारपणा येऊन विश्वबंधुत्ववृत्ति जागृत झाली पाहिजे. संसाराअरण्यांतील दुःखसमुच्चयांवर विजय मिळावा, त्यांची बाधा होऊं नये, अशी इच्छा असेल, तर स्वाभाविक स्वार्थपरायणता टाकून दिली पाहिजे.

मनुष्य मनोदौर्बल्यानें हतवीर्य होतो, आणि त्यांचें हृदय व मन हीं कमकुवत झाल्यामुळें अनन्यगतिक होऊन दुःख मात्र त्याच्या वांट्याला येतें. अशासाठीं मग 'श्रेयःसाधना'चा मार्ग चोखळणें बरें नव्हे काय ? 'श्रेयःसाधना'चा आनंद किती श्रेष्ठ आहे ! यासाठीं मनोजय करा, मनाचा दुबळेपणा पार झुगारून द्या, स्वार्थरूपी जबर पिशाचाला गति घेण्याला लावा, तेंच सर्व आधिव्याधींचें मूळ बीज आहे. मनाला चाहील ते भोग भोगण्याची, किंवा आपस्वार्थीपणाची हांव सोडून द्या. त्यांनां आपल्या स्वभावांत थारा देऊं नका. करड्या नजरेनें आणि बळकट मनोधैर्यानें त्यांनां पार हुसकून लावा. मनुष्यानें स्वतःच्या मनाला 'करतलामलकवत्' स्वाधीन करून घ्यावें. इंद्रियांनां कह्यांत बाळगावें, त्यांच्या कह्यांत आपण जाऊं नये. मनुष्यानें सुखाच्या लालसेचा दास, किंवा प्रत्येक गोष्टीचा हपापलेला गुलाम बनूं नये. त्यानें स्थितप्रज्ञ आणि समाधानी बनून कसाहि प्रसंग आला तरी मनाची समता ढळूं देऊं नये. आपल्या इच्छाशक्तीला 'आत्मजय'करण्याकडे वळवावें.

ती एकदां कह्यांत आली ह्मणजे तिची अनुकूल अशीच प्रवृत्ति होईल. सृष्टिनियमांविरुद्ध आचरण करावें अशी प्रवृत्ति होणें हाच मनुष्यस्वभावांतील मुख्य दोष आहे, व हीच पापप्रवृत्ति आणि सर्व दुःखांचें मूळ होय. मनुष्य अज्ञानामुळें असें मानीत असतो, कीं, सृष्टिनियमाला धाब्यावर बसवून आपण इतरांवर आपली छाप पाडूं; परंतु तें साध्य न होतां सृष्टिनियमांशीं झगडणाराच्या सामर्थ्याचा ऱ्हास मात्र होतो. मनुष्याला हा आपला दोष काढून टाकतां येण्यासारखा आहे. त्याला आपलें अज्ञान नष्ट करतां येईल, त्याला आपली पापवासना आणि अहंपणा हीं सोडतां येतील, आणि स्वैर प्रवृत्तीला आळा घालतां येईल. त्याला आत्मजयहि करतां येईल. त्याला इच्छा मात्र पाहिजे. आणि या सर्व कृतींतच त्याचा सर्व पुरुषार्थ आणि दैवी सामर्थ्य हीं दिसून येतात. मनुष्यानें आपलें अस्तित्व जगांत कोणत्या नियमानें शक्य झालें आहे ते नियम ओळखून, एकाद्या आज्ञाधारक मुलानें आपल्या पित्याची आज्ञा समजून ती परिपालन करावी त्याप्रमाणें ते नियम पाळावे. अशा रीतीनें चाललें असतां तो आपल्या इंद्रियग्रामाचा व इच्छाशक्तीचा स्वामी बनून त्यांचा उपयोग आत्मकार्याकडे न करितां मोठ्या शहाणपणानें लोककल्याणाकरितां करण्याची त्याला शक्ति येईल. जगांत अशी कोणतीहि दुष्ट संवय, अगर पापबुद्धि, किंवा दुःखस्थिति नाहीं, कीं, ज्यांचा त्याला पुरा मोड करितां येणार नाहीं. ह्मणून प्रत्येकानें आपली शक्ति ओळखून मनोजय करावा. हें जग मनुष्याकरितां उत्पन्न केलेलें आहे. त्यांत त्यानें दीनदुबळ्याप्रमाणें किंवा एकाद्या नवख्या मनुष्याप्रमाणें लोकांच्या मदतीची अपेक्षा न करितां जगाचा योग्य उपयोग करून घ्यावा, असाच सृष्टिकर्त्याचा हेतु आहे.

## पुरुषार्थ आणि सद्भाव.

बळकट आत्मविश्वास आणि विनय हीं एकत्र असणें असंभवनीय नाहीं. दुसऱ्यावर हुकमत चालवितेवेळीं मनुष्य बेमुर्वतखोर आणि अहंमन्य बनतो; परंतु स्वतःवर मात्र त्याला जरूर ती हुकमत अगर सत्ता चालवितां येत नाहीं. स्वतःवर पूर्ण ताबा आणि दुसऱ्यांबद्दल योग्य आदरबुद्धि यांच्या मिलाफानें खरें मनुष्यत्व येतें.

तेव्हां मनुष्यानें प्रामाणिक, निष्कपट आणि सद्भावयुक्त असावें. कपट म्हणजे मूर्खपणाचा कळस, आणि दांभिकपणा म्हणजे पृथ्वीवरील अत्यंत दुर्बल गोष्ट होय. दुसऱ्याला फसविण्यांत मनुष्य स्वतःला फसवून घेतो. मनुष्यानें स्वतः कपट, क्षुद्रता आणि फसवेगिरी यांच्यापासून इतकें अलिप्त असावें, कीं, अंतस्थ टोंचणी अगर मनाची चलबिचल न होतां किंवा न लाजतां त्याला निश्चल मुद्रेनें दुसऱ्याच्या नजरेला नजर भिडवितां येईल. ही गोष्ट निष्कपटपणाशिवाय शक्य नाहीं. सद्भावनेवांचून मनुष्याचें अस्तित्व ह्मणजे केवळ सोंग होय, आणि सद्भावनेशिवाय मनुष्यानें कोणतेंहि काम हातीं धरलें तरी त्यांत कांहीं राम नसून तें कधींहि परिणामकारक होणार नाहीं. रित्या भांड्यांतून नादहि रितेपणाचाच निघावयाचा, आणि जेथें निष्कपटपणा नाहीं तेथें शब्दाचें अवडंबर हाच परिणाम होणार.

कांहीं लोक समजूनउमजून कपट अथवा दंभ माजवितात असें नाहीं; परंतु अज्ञानामुळें ते अशा आडमार्गांत शिरतात, कीं, त्यामुळें त्यांच्या सच्छीलाची माती होऊन त्यांना शेवटीं दुःख भोगावें लागतें. असे लोक कोठें कीर्तनपुराण असलें तर तें चुकविणार नाहींत. देवानें आपणाला सद्बुद्धी द्यावी, आपल्या हातून सद्वर्तन घडावें ह्मणून ते नित्य प्रार्थना करितील, परंतु सद्भावानें मुळींच वागणार नाहींत; पुराणांतील वांगीं पुराणांत अशी यांची

स्थिति असते. घरीं आले कीं आपल्या शत्रूला शिव्या देण्याचा तडाका सुरू करतील. याहूनहि नीच काम म्हणजे आपला गैरहजर मित्र जो समक्ष भेटला असतां त्याबद्दल मोठा आदरभाव दाखवितील व त्याचीच त्याच्या मागें नालस्ती अगर हेटाळणी करण्याला मागेंपुढें पाहणार नाहींत! आश्चर्य एवढेंच, कीं, अशा लोकांना आपल्या या ढोंगाची पूर्ण कल्पनाहि असत नाहीं. अशा लोकांचें व त्यांच्या मित्रांचें एकदां वितुष्ट आलें–व तें येणें साहजिक आहे–कीं, हे लोक जगाच्या कपटपटुत्वाबद्दल आणि बाष्कळपणाबद्दल व्याख्यानें झोडावयाला तयार होऊन 'काय करावें हो? जगांत खरे मित्र मिळणें कठिण आहे!' असें मोठ्या कंठरवानें सांगत सुटतील!

खरोखरच, अशा लोकांना कायमचे मित्र मिळणें कठीण आहे. कारण, ढोंगीपणा हा जरी डोळयांना प्रत्यक्ष दिसला नाहीं, तरी त्याची जाणीव मनाला होते. ज्यांचा दुसऱ्यांवर विश्वास बसत नाहीं अथवा ज्यांना दुसऱ्याचा सद्भाव किंवा निष्कपट वर्तन हीं समजत नाहींत, त्यांच्याबद्दल दुसऱ्यांच्या मनांत या भावना जागृत होणें अशक्य आहे. दुसऱ्याशीं खरेपणानें–सद्भावानें–वागा म्हणजे दुसरेहि तुमच्याशीं तसेच वागतील. शत्रूंच्या स्वभावाचें सर्व बाजूंनीं निरीक्षण करा आणि गैरहजर मित्राची बाजू राखा. मनुष्यस्वभावांत कांहीं चांगलें म्हणून राहिलेलें नाहीं अशी जर तुमची भावना असेल, तर तुमच्या समजांत कांहीं तरी चूक होत आहे अशी खात्री असूंद्या, आणि आपण कोठें कसे चुकत आहों याचा नीट छडा लावा.

चिनी लोकांचा धर्मगुरू कान्फ्यूशिअस यानें निष्कपटपणाबद्दल असें लिहिलें आहे, कीं "निष्कपटपणा किंवा सद्भाव हा पांच मुख्य सद्गुणांपैकीं एक आहे." तो आणखी असेंहि म्हणतो, कीं " सद्भा-

वानें तुमच्या जीविताचें बीज होतें. सद्भावावांचून तुमचीं सर्व कृत्यें फुकट आहेत, व त्यावांचून वरून सद्‌गुणाचे केवळ पुतळे दिसणारे लोक दांभिक असें समजा. तसेंच ज्या ज्ञानाची तुमच्यावर छाप बसते तें ज्ञान सद्भावयुक्त नसेल तर तें मनोविकारांच्या झुळुकेबरोबर विझून जाणारी निर्जीव ज्योत होय. मनाची शुद्धि पाहिजे असेल तर आत्मवंचन सोडलें पाहिजे. घाणेरड्या वस्तूचा त्याग करावा त्याप्रमाणें दुर्गुणांचा त्याग केला पाहिजे, आणि रमणीय वस्तूचा जसा आपण जीवेंभावें अभिलाष करितों, तशी सद्‌गुणांची हांव धरली पाहिजे. सद्‌गुणांशिवाय स्वाभिमान उत्पन्न व्हावयाचा नाहीं, आणि म्हणूनच सद्गुणी मनुष्यानें केव्हांहि आपल्या मनांत वाईट विचारांनां थारा देऊं नये."

"नीच मनुष्य आपला रिकामपणचा वेळ गुप्तपणें दुष्कृत्यें करण्यांत घालवितो, आणि त्याच्या दुष्टपणाची मजल कोठपर्यंत जाईल, तें सांगता येत नाहीं. शुद्धाचरणीं मनुष्याच्या समोर तो दुटप्पी वर्तनानें वागून आपली चांगली बाजू तेवढीच त्याच्या निदर्शनाला आणतो; परंतु त्याचा हा लपंडाव ज्याला त्याच्या स्वभावाची ओळख झाली अशा मार्मिकापुढें कशाचा टिकणार ? त्याचें ढोंग बाहेर पडावयाचेंच.

"हजारों लोकांची ज्याकडे दृष्टि वेधलेली असते, किंवा हजारों लोक ज्याकडे बोट दाखवितात, अशा अग्रणी मनुष्यावर सर्वांचा जणूं काय खडा पहाराच असतो; कारण, त्याच्या हातून यत्किंचित् बरेंवाईट घडलें तरी त्याचा बभ्रा होतो. म्हणूनच सद्गुणी मनुष्याला एकाकी असतांनाच फार जपून राहिलें पाहिजे."

म्हणूनच निष्कपटी मनुष्यानें असें कोणतेंहि कृत्य करूं नये, किंवा असा कोणताहि शब्द उच्चारूं नये, कीं, ज्याची परिस्फुटता झाली

असतां लज्जेनें मान खालीं घालण्याचा प्रसंग येईल. निष्कपटी मनुष्याला त्याच्या सरळपणामुळें न डरतां लोकांत डोकें वर करून पूर्ण निःशंकपणें वावरतां येतें. त्याच्या आगमनानें लोकांनां मोठा धीर येतो, त्याचा शब्द हितकर, रास्त आणि सत्य असल्यामुळें परिणामकारी असतो. त्यानें कोणतेंहि काम हातीं घेतलें तरी त्यांत त्याला जयच येतो. त्याचे भाषण नेहमींच कानाला गोड लागण्यासारखें नसलें तरी त्याच्या योगानें लोकांच्या अंतःकरणावर छाप बसते. लोक त्याला आपला नेता समजून त्याच्यावर विश्वास ठेवितात आणि त्याला मान देतात.

धैर्य, आत्मनिष्ठा, सद्भाव, उदारपणा आणि प्रेमळपणा यांच्या योगानें मनुष्याच्या आंगीं खरें मनुष्यत्व येतें. त्यांच्या अभावीं मनुष्य केवळ परिस्थितींत गटंगळ्या खाणारें मातीचें बाहुलें होय. अशा दुबळ्या आणि भ्रांतिकर प्राण्याला जीविताची खरी गोडी आणि आनंद चाखावयाला कसा मिळणार? प्रत्येक होतकरू मनुष्यानें हे गुण आंगीं यावे ह्मणून प्रयत्न करावा, आणि जसजसे ते त्याला साध्य होतील, तसतसा त्याला श्रेयस्साधनाचा मार्ग सुलभ होईल.

या जगांत नवीन तऱ्हेचीं स्त्रीपुरुषें उत्पन्न व्हावयाचीं आहेत. पुरुष खंबीर मनाचे, सद्भावयुक्त, उदार होऊन, क्रोध, अशुद्धाचरण, दुराचार आणि द्वेष यांनां बळी न पडतां 'मानव' हें नांव सार्थ करणारे असे व्हावयाचे आहेत. तसेंच स्त्रिया खऱ्याखुऱ्या स्त्रीजातीचीं भूषणें होतील; मर्यादशील, सत्यप्रिय, पवित्र, साध्वी बनून अनृतसाहसादि दुर्गुणांनां त्यांच्या स्वभावांत थारा मिळणार नाहीं, आणि अशा स्त्रीपुरुषांच्या पोटीं मनुष्यजातीला ललामभूत अशीं श्रेष्ठ दर्जाचीं अपत्यें निपजतील. त्यांनां पाहिल्याबरोबर दुष्ट आणि शठ यांची गठडीच वळेल. त्यांच्या योगानें सृष्टीचें पुनरुज्जीवन होईल

तीं मनुष्यजातीचा श्रेष्ठपणा वाढवून सृष्टीचा मोठेपणा कायम राखतील, आणि अखिल मनुष्यजातीमध्यें प्रेम, सुख आणि शांति यांची वृद्धि करतील, आणि त्यांच्यायोगानें सर्व सृष्टींत पाप आणि दुःख यांचा बीमोड होऊन सर्वत्र सद्गुणांचें अधिराज्य होईल.

# कर्तृत्वशक्ति आणि सामर्थ्य.

सर्व जगाला व्यापून असणारी 'शक्ति' किती आश्चर्यकारक आहे! तिच्या कार्याला कधींहि खळ नाहीं, ती कधींहि संपावयाची नाहीं, आणि तिचें कार्य अविनाशी आहे असें भासतें व ती अणूपासून ब्रह्मांड व्यापून राहिली आहे. या अतर्क्य शक्तीचा प्रभाव चलायमान अशा प्रत्येक निमिषमात्रावर घडत आहे.

या आदिकारणशक्तीचा मनुष्यप्राणी हा एक अंश आहे. ती त्याच्या ठिकाणीं मायाममता, राग, लोभ, बुद्धि, नीति व विचार शक्ति, धारणाशक्ति इत्यादि मानसिक शक्तींनीं अथवा त्यांच्या समुच्चयांनीं भासमान होत असते. मनुष्य केवळ आंधळेपणानें तिचा उपयोग न करितां शहाणपणानें तिला कह्यांत ठेवून तिच्याकडून कार्य करून घेत असतो. सावकाश परंतु खात्रीपूर्वक मनुष्य हा बाह्य शक्तींवर ताबा मिळवून त्यांनां आपल्या मनासारखें काम करण्यास लावीत असतो. त्याचप्रमाणें जसजशी तो आपल्या अंतःशक्तींवर अथवा त्यांच्या समुच्चयांवर आपली हुकमत चालवून त्यनां कह्यांत आणील, तेव्हां त्याच्या विचारशक्ति एकतंत्री होऊन सुखप्रवण होतील, यांत संदेह नाहीं.

मनुष्य हा या जगांत अशेष वस्तुजाताचा स्वामि व्हावा—दास नव्हे—अशीच त्याची खरी योग्यता आहे. सन्मार्गानें 'नेता' व्हावें, असन्मार्गानें दास बनूं नये, हीच त्याची इतिकर्तव्यता आहे. त्याचें शरीर आणि मन या प्रदेशद्वयांवर त्याचें राज्य चालावयाचें आहे. यासाठीं त्याला कडकडीत सत्य पाळलें पाहिजे, आणि पूर्ण आत्म-

जय केला पाहिजे, व हें राज्य करतांना त्यानें आपल्या शुद्ध, शाश्वत आणि उत्पादकशक्तीचा शहाणपणानें उपयोग करावयाचा आहे. त्यानें जगांत निःशंक, धैर्यवान्, पराक्रमी, कृपाळू आणि उदार अशा रीतीनें वागलें पाहिजे. स्वतःस अधोगतीला नेऊन मान खालीं न घालतां मनुष्यत्वाच्या पूर्ण ऐश्वर्यामध्यें त्याला चालतां आलें पाहिजे. आपस्वार्थीपणा आणि पश्चात्ताप यांत गुरफटून क्षमा आणि दया यांची याचना न करितां शुद्ध आयुष्यक्रम चालवून त्याच्या तेजानें त्यानें जगांत संचार केला पाहिजे.

मनुष्यप्राणी फार प्राचीन काळापासून आपणांला क्षुद्र, दुर्बल, अपात्र मानीत आला आहे, आणि याच स्थितींत राहण्यांत त्याला समाधान होत आहे. परंतु आतां जो शुभकाल प्राप्त झाला आहे त्यांत त्याला असें दिसून येत आहे, कीं, आपण शुद्ध, सामर्थ्यवान् आणि उदार असून आपल्या इच्छामात्रेंकरून मारा करून आपणाला सद्गुणी होतां येणार आहे, आणि हा मारा एकाद्या बाह्य शत्रूवर, शेजाऱ्यावर, भूतांखेतांवर किंवा राष्ट्रांवर नसून आपल्या मनावर पगडा बसविणाऱ्या अज्ञान, मूर्खपणा आणि दुःख इत्यादिकांवर होय. कारण, अज्ञान आणि मूर्खपणा यांच्याचमुळें केवळ मनुष्य दीन होतो; परंतु ज्ञान आणि चातुर्य यांच्यायोगानें त्याचें राज्यपद त्याला प्राप्त होतें. मनुष्य हा दुर्बळ आणि पंगु आहे, त्याच्या हातून कांहीं पुरुषार्थ व्हावयाचा नाहीं असें ह्मणणारे खुशाल ह्मणोत; परंतु आह्मी तर ह्मणतों, कीं, मनुष्य पराक्रमी आणि कर्तृत्ववान् आहे. आह्मी ही लेखमाला ज्यांना कर्तृत्वाची चाड आहे, जिज्ञासा आहे, जगाच्या कल्याणाकरितां स्वार्थत्याग करण्यास व क्षुद्र मनोवृत्ति सोडून जे संतुष्ट आणि अननुतप्त राहण्यास तयार आहेत, अशा ' मनुष्यां'करितां लिहीत आहोंत. स्तनंधयेयां-

करितां नव्हे. मूर्ख आणि विचारशून्य लोकांनां सत्यमार्गाचें आकलन व्हावयाचें नाहीं, आणि शंकेखोर व उडाणटप्पू लोकांनां श्रेष्ठ आयुष्यक्रमाची महती काय समजणार ?

मनुष्य हा शास्ता आहे. तो जर तसा नसता, तर त्याला सृष्टिनियमाचें उल्लंघन करितां आलेंच नसतें. त्याचे दुर्गुण हेच त्याच्या सामर्थ्याचें द्योतक आहेत. त्याची पापबुद्धि ह्मणजे शुद्धाचरणाच्या इच्छेचा व्युत्क्रम होय. त्याचे दुर्गुण आणि पाप ह्मणजे त्याच्या शक्तीचा दुरुपयोग–सामर्थ्याचा गैरशिस्त उपयोग नव्हे तर काय? या दृष्टीनें दुराचरणी हा सामर्थ्यवानच ह्मटला पाहिजे. त्याच्या अज्ञानामुळें आपल्या शक्तीचा उपयोग सत्कार्याकडे करण्याऐवजीं तो असत्कार्याकडे करतो, एवढेंच काय तें. शक्तीच्या अपव्ययाचें प्रायश्चित्त ह्मणजे दुःख होय. दुष्ट मनुष्य वागणुकीची तऱ्हा बदलल्यानें सुष्ट होईल. तुह्मांला आपल्या पापाचरणाबद्दल जर पश्चात्ताप वाटत असेल, तर पापमार्ग सोडून देऊन मनावर ‘ पापप्रवृत्ती ’चा पगडा बसूं देऊं नका; आणि अशा रीतीनें तुह्मी वागूं लागलां ह्मणजे तुमचा दुबळेपणा जाऊन तुह्मी सामर्थ्यवान् व्हाल, आणि तुमच्या दुःखाचा शेवट होऊन तुह्मांला आनंद लाभेल. आपली दुष्ट प्रवृत्ति सोडून त्याऐवजीं मन सन्मार्गवर्ती केल्यानें दुष्ट मनुष्याचा देखील साधु बनतो. ही विश्वव्यापिनी ‘कर्तृत्वशक्ति ’ अमर्याद असली तरी विशिष्ट आकारांनी तिला मर्यादा प्राप्त झालेली आहे. मनुष्याला त्याच्या आकारमानाप्रमाणें कांहीं विवक्षित प्रमाणांत ही शक्ति मिळालेली असते. तिचा त्याने हवातसा सदुपयोग अगर दुरुपयोग करावा. ती जपून खर्च करून तिची एकाग्रता करावी, किंवा तिचा असद्व्यय करून तिची धुळधाणहि करून टाकावी. एकाग्र केलेली ‘कर्तृत्वशक्ति ’ ह्मणजेच ‘सामर्थ्य’ होय. या शक्तीचा सदुपयोग

करणें ह्मणजेच्च चातुर्य अगर ज्ञान होय. जो मनुष्य आपली सर्व 'कर्तृत्वशक्ति' एकत्र करून तिचा उपयोग एकादें महत्कार्य साधण्याकडे करतो, आणि शांतपणें काम करून त्या महत्कार्याच्या फलाची वाट पाहतो आणि आपल्या इच्छा चांगल्या कामाकारितां मोडून काढतो, तोच मनुष्य सामर्थ्यवान् आणि प्रभावशाली होय. जो प्रसंगप्राप्त वासनेच्या शांत्यर्थ, क्षणिक सुखाच्या लालसेनें विवेकभ्रष्ट होऊन मनाला भडकूं देतो, तो मूर्ख आणि दुर्बल समजावा.

एका कार्याकडे लाविलेली 'शक्ति' दुसऱ्या कार्याकडे लावितां येत नाहीं. हा नियम सृष्टीमध्यें 'जडां'त व 'जीवां'त अप्रतिहत चालू आहे. 'इमर्सन' या नियमाला 'विनिमयाचा नियम' असें ह्मणतो. एका विवक्षित कार्यांत लाभ झाला तर दुसऱ्या बाजूला हानि झालीच पाहिजे. तराजूच्या एका पारड्यांत जोर लाविला तर दुसऱ्या पारड्यांत तो कमी झाला पाहिजे. सर्वत्र समतोलपणा राखण्याकडे निसर्गाची प्रवृत्ति आहे. जी शक्ति निरुपयोगीपणांत घालविली तिचा काय उपयोग झाला? ती फुकट गेली. सुखाच्या पाठीला लागलेल्याला तत्त्वशोध कसा होणार आहे? रागाच्या लहरींत केलेला शक्तिक्षेप सद्गुणाच्या सांठ्यांतून—विशेषेंकरून शांतीच्या संचयांतूनच खर्च केलेला असतो. पारमार्थिक भाषेंत बोलावयाचें ह्मणजे 'विनिमय नियमा'स 'त्याग' ह्मणावें. जर आपणाला पवित्रता मिळवावयाची असेल तर व्यक्तिविषयक सुखाचा 'त्याग' केला पाहिजे. 'प्रेम' मिळवावयाचें' असेल तर दुष्टपणाचा त्याग केला पाहिजे. सद्गुणार्जन करावयाचें असेल तर दुर्गुणांचा त्याग केला पाहिजे.

आपली उन्नति व्हावी अशासाठीं तळमळ लागलेल्या लोकांनां सकृद्दर्शनींच कळून येतें, कीं, आध्यात्मिक, आधिदैविक किंवा आधिभौतिक मार्गांत आपणांला कांहीं फलप्राप्ति व्हावी अशी उत्कंठा

असेल, तर 'वासनानिग्रह' केला पाहिजे, आणि मोहक वाटणाऱ्या अनेक गोष्टींचा त्याग केला पाहिजे. नुसतें मोहक वाटणारेंच नव्हे— तर अवश्य वाटणाऱ्या गोष्टींचा देखील त्याग केला पाहिजे. 'उच्च ध्येय' साध्य करण्यासाठीं तत्पर झालेल्या मनुष्यानें दृढमूल झालेल्या संवयी, नाना तऱ्हेचीं व्यसनें, दुष्ट छंद, आणि आपल्या ध्येयाला विघातक असणारीं सर्व कृत्यें यांचा त्याग केला पाहिजे. काल आणि शक्ति हीं मर्यादित असून त्यांचा फार जपून उपयोग केला पाहिजे. मूर्ख लोक आपल्या शक्तीचा उपयोग आलस्य, निद्रा, ऐषआराम, ख्यालीखुशाली अथवा पोकळ गप्पा मारण्यांत करितात, किंवा दुष्ट मनोवृत्तींत व्यग्र होऊन विषयवासना तृप्त करून घेण्यामध्येंच सुखसर्वस्व समजून त्यांत शक्तीची माती करितात, अथवा भलत्याच शुष्कवादांत पडून अगर नाहीं त्यांत नाक घालून कुरापती काढण्यांत शक्तीचा व्यय करितात, आणि मग ह्मणत असतात, कीं, इतरांप्रमाणें आपण लोकोपयोगी, यशस्वी किंवा सद्गुणमंडित होण्याला पात्र असण्याइतके नशीबवान् नाहीं ! आणि जे त्यांचे इतर पूज्य शेजारी कर्तव्यकर्म करण्याकरितां स्वार्थत्याग करण्यास किंवा आपल्या सर्व कर्तृत्वशक्तीचा आयुष्यांतील उच्चतम ध्येय साध्य करून घेण्याकडे मनःपूर्वक उपयोग करीत असतील, त्यांचा व्यर्थ हेवा करीत बसतात ! "जो सरळ मार्गानें चालतो, सत्य भाषण करतो, आणि आपलें काम बरें कीं आपण बरे अशा रीतीनें वागतो, त्यालाच लोक मान देतात." ज्यानेंत्यानें आपापलें काम करावें, आपल्या सर्व ज्ञानशक्तींची आणि कर्तृत्वशक्तींची एकाग्रता करून त्यांचा आयुष्यांतील इतिकर्तव्यतेकडेच पूर्ण उपयोग करावा. दुसऱ्याच्या भानगडींत अगर दुसऱ्यांना नांवें ठेवण्यांत गढूं नये, ह्मणजे प्रत्येकाच्या असें अनुभवाला येईल, कीं, जीविताचा हेतु उच्च असून तें साधें आणि सुखावह आहे.

# कर्तृत्वशक्ति आणि सामर्थ्य.

सर्व विश्वाला सद्गुणांचा आणि सामर्थ्याचा कोट असून सच्चरित आणि सुवृत्त लोकांचा त्यांत परिपाल होत आहे. पाप आणि दुर्गुण हीं स्वतःचाच नाश करणारीं आहेत. विषयलोलुपताहि अधोगतीला नेणारी आहे. सृष्टीला सामर्थ्याची आवड आहे. ' बळी तो कान पिळी ' यांत आह्मांला कांहीं वावगें दिसत नाहीं. हा नियम जसा सृष्टींत तसा तो पारमार्थिक ज्ञानालाहि लागू पडतो. पशुवृत्तीच्या मनुष्याच्या ज्या प्रबल मनोवृत्ति असतील त्याच्याच योगानें त्याची उन्नति होण्याचा संभव आहे. मनुष्याच्या उदात्त नैतिक प्रवृत्तीच्या योगानें त्याची दुःखमुक्तता व्हावयाची आहे, आणि त्या प्रवृत्तीचें वर्चस्व झालें ह्मणजेच क्षुद्र प्रवृत्तींचें समूळ उच्चाटन होईल. ज्याच्या मनावर क्षुद्र मनोवृत्तीचा पगडा बसला त्यानें आपल्या हातानें आपला नाश करून घेतला. त्याला डोकें वर काढण्याची आशा नको, व ऐहिक अगर पारमार्थिक या दोन्ही लाभाला तो मुकला, असें समजावें. " पशुतुल्य " प्रवृत्तीमध्यें ज्या जीविताचा विनियोग झाला, तें उच्च प्रवृत्तीला ठार मुकलेंच पाहिजे. इतकेंच नव्हे, तर नीच प्रवृत्तींतहि त्याला कांहीं लभ्यांश न होतां सर्वच ग्रंथ आटपतो. कारण, असन्मार्गाचें अवलंबन ह्मणजेच मुळीं भ्रमाचा भोपळा होय. परंतु सन्मार्गप्रवृत्तीनें आयुष्यक्रमण केलें असतां त्यांत कांहींएक तोटा न होतां जगाच्या दृष्टीनें सदाचरणी मनुष्याला जरी पुष्कळ चांगल्या गोष्टी सोडाव्या लागतात असें दिसतें, तरी तत्त्वतः चांगल्या गोष्टींचा त्याग त्यांत करावा लागत नाहीं. आणि सदाचरणी मनुष्याचें चरित्र सर्वांनां कित्त्यादाखल होऊन त्याची स्मृति अनंतकालपर्यंत राहते. असत् आणि क्षुद्र प्रवृत्तीच्या लोकांचा नाश झालाच पाहिजे! पण ज्याची प्रवृत्ति नेहमीं सत्य व सदाचार यांकडेच असते, त्याची प्रगति होऊन त्याला मग कशाचाहि त्याग करण्याचें कारण न रहातां

सर्व गोष्टींची अनुकूलता होऊन जगांतील सर्व बाह्यधामधुमींत त्याला यश मिळतें, व त्याची मानसिक उन्नतिहि सुलभ होते.

ह्मणून दृढनिश्चयी होण्याचा प्रयत्न करा. दृढनिश्चयाच्या पायावर श्रेय:साधनाचें भव्य मंदिर व्हावयाचें आहे. आयुष्यांत एक विवक्षित 'ध्येय' आणि तत्प्रीत्यर्थ दृढ कर्तव्यनिष्ठा अंगीं बाणली नाहीं, तर जीवित कंटाळवाणें, चंचल आणि रुक्ष वाटेल. प्रत्येक क्षणाचा उद्योग एका विवक्षित हेतूच्या सिद्ध्यर्थ घडला पाहिजे. प्रसंगीं तुमची वागणूक निरनिराळ्या तऱ्हेची असेल, परंतु अंतःकरण योग्य मार्गांत गढलेलें असलें ह्मणजे तुमच्या हातून अकार्य अगर दुष्कृत्य कधींहि होणार नाहीं. आणीबाणीच्या प्रसंगानें कदाचित् क्षणभर तुमच्या मनाची चलबिचल झाली, तरी लगेच तुमचें मन ठिकाणावर येऊन तुह्मी प्रत्येक प्रसंगांतून पार पडाल, व अशा अनुभवजन्य ज्ञानानें तुह्मी अधिक दूरदर्शी आणि विशेष सामर्थ्यवान् व्हाल. मात्र प्रत्येक कामांत अंतस्थ विचारशक्तिरूप होकायंत्राच्या सल्यानें तुह्मीं आपलें आयुष्यरूपी जहाज चालविलें पाहिजे. सदसद्विचारशक्तीचा सल्ला कुचकामाचा समजून त्याचा अव्हेर करून मन मानेल तसें वागून भटकतां कामा नये. सदसद्विचारशक्तीला बरें दिसेल त्याप्रमाणें वागा. तुमचीं जीं ठाम मतें असतील त्यांना चिकटून रहा. एकादा प्रसंग प्राप्त झाला असतां भ्रांतचित्त किंवा किंकर्तव्यमूढ न होतां तुह्मांला जें योग्य दिसेल तसेंच आचरण ठेवा. एकाद्या प्रसंगीं तुमचें कर्तव्यकर्म तुह्मी बजावीत असतां कार्यसिद्धीसाठीं कांहीं कडक उपायांची योजना करणें अवश्य आहे अशी तुमची समजूत असेल, तर त्यांचा अंमल करण्यास तिळभरहि कचरूं नका. भ्याडपणा दाखविण्यापेक्षां लोकांनीं तुह्मांला कडक ह्मटलेलें पुरवलें. तुह्मी जी उपाययोजना करणार असाल ती कदाचित् सर्वोत्कृष्ट नसेल; परंतु

तुह्मांला अवगत असलेल्या उपायांपैकीं तो उत्तम उपाय आहे अशी तुमची खात्री असेल, तर त्या उपायाचें अवलंबन करणें एवढेंच तुमचें काम आहे. त्यामुळें ज्ञानप्राप्ति व्हावी अगर शहाणपणा यावा अशी तुह्मांला उत्कंठा असेल, तर दुसरा एकादा चांगला उपाय सहजगत्या तुह्मांला समजून येईल. कोणत्याहि कामाला हात घालण्यापूर्वी वाटेल तितका विचार करा;परंतु एकदां हात घातला ह्मणजे मग मागेंपुढें करूं नका. काम, क्रोध, लोभ आणि दुराग्रह हीं सोडून द्या. क्रोधवश मनुष्य दुर्बल होय. दुराग्रही मनुष्य–जो आपली वागणूक बदलूं शकत नाहीं किंवा ज्ञानप्राप्ती करून घेऊं इच्छित नाहीं तो मूर्ख समजावा. अशा मनुष्याचें आयुष्य मूर्खपणांतच खलास होतें, आणि त्याचे केंस पिकले ह्मणून त्याला मान अगर मोठेपणा मिळत नाहीं. कामी मनुष्याची कर्तृत्वशक्ति केवळ सुखोपभोगापुरतीच जागृत असते, व त्यामुळें पुरुषार्थाचीं कामें किंवा आत्मोन्नति या कार्याकरितां कांहीं शिल्लक उरतच नाहीं.लोभी मनुष्याला मनुष्यस्वभावांतील उच्च मनोवृत्ति अथवा सच्चरित्राची महती यांची कल्पनाहि नसते. तो दिव्यसुखाचा अनुभव घेण्याऐवजी दुःखभार वाढविणाऱ्या गोष्टींचा हव्यास करीत असतो.

तुमचें सामर्थ्य तुमच्यापाशीं आहे त्याचा उपयोग तुह्मीं आपली उन्नति अगर अधोगति करण्याच्या कामीं करावा."**उद्धरेदात्मानात्मानम् । नात्मानमवसादयेत्** ॥" तुह्मीं आपल्या कर्तृत्वशक्तीचा उपयोग सत्कार्यी करावा, किंवा आपस्वार्थीपणांत तिची वाट लावावी ?' एकच शक्ति तुह्मांला उपयोगपरत्वें देव अगर पशु बनवूं शकते. तिला जसें तुह्मी वळण लावाल त्या मानानें फलप्राप्ति व्हावयाची आहे. " माझें मन दुर्बल आहे, " हा विचार देखील मनांत आणूं नका ! विचारांना योग्य वळण लावून दुर्बलतेचें शक्तीमध्यें, आणि शक्तीचें पराक्रमामध्यें पर्यवसान होऊं द्या. आपल्या विचारांनां उच्च मार्गाला

लावा. भ्रामक गोष्टी आणि मूर्खपणाच्या वासना अगदीं सोडून द्या. आत्मस्तुति, परनिंदा सोडून देऊन असत्प्रवृत्तींत आसक्त होऊं नका. डोकें वर करा, खालीं घालूं नका. आपली दैवी शक्ति प्रकट करा. आणि मनाचें आणि जीविताचें सर्व किल्मिष आणि क्षुद्रपणा सोडून द्या. एकाद्या जखडलेल्या गुलामाप्रमाणें झुरूमुरू आयुष्य न कंठतां खऱ्या विजयशाली वीराप्रमाणें तुमचा आयुष्यक्रम चालूं द्या.

# आत्मसंयमन आणि सुख.

विचारशक्तीला कमी अडथळयाच्या मार्गानें जाऊं देणें, आणि सोयीच्या मार्गानें वागणें, याला मानसिक दौर्बल्य ह्मणतात. पण तीच शक्ति एकाग्र करून आपल्या उन्नतीसाठीं कष्टसाध्य गोष्टी प्राप्त करून घेण्याकडे लाविली जाते तेव्हां तिला सामर्थ्य ह्मणतात. ही विचारशक्तीची एकाग्रता आणि हें सामर्थ्य आत्मसंयमनानें प्राप्त होतें.

आत्मसंयमन शब्दानें घोटाळा होण्याचें कारण नाहीं. त्याचा अर्थ स्वतःचें कांहीं चालूं न देणें असा नसून, योग्य कार्याकरितां 'इंद्रिय जय' करणें, असा आहे. आत्मसंयमन ह्मणजे आपल्या सर्व विचार-शक्ति लुप्तप्राय करणें नसून त्यांनां तीक्ष्ण करणें होय. आत्मसंयमन हें दैवी संपत्तीचा अंश असून त्याच्या योगानें 'दुर्बल' हा 'सामर्थ्य-वान्' 'अज्ञान्या'चा 'ज्ञानी' आणि अधमाचा 'उत्तम' होईल. त्यामुळें दुर्गुणाची जागा सद्गुण भरून काढतील, आणि दुष्ट मनोविकारांचा नायनाट होऊन उच्च मनोवृत्ति जागृत होतील. जो मनुष्य आपली दुसऱ्यावर छाप बसावी यापलीकडे कांहीं उच्च हेतु मनांत न धरितां आपला खरा स्वभाव कांहीं काळपर्यंत दाबून धरितो, तो ढोंगी होय. त्याला आत्मसंयमी असें कोणीहि ह्मणणार नाहीं. दगडी कोळसा आणि पाणी यांपासून गॅस व वाफ उत्पन्न करून एकादा यंत्रें चाल-विणारा मनुष्य ज्याप्रमाणें हजारों प्रचंड यंत्रांनां गति देऊन मानव-जातीच्या सुखप्राप्तीकडे त्यांची योजना करितो,त्याप्रमाणेंच बुद्धिपूर्वक आत्मसंयमन करणारा मनुष्य आपल्या क्षुद्र मनोवृत्तींनां उत्तम आणि

नीतियुक्त बनवून त्यांपासून आपलें आणि जगाचें सुख वाढविण्यास कारणीभूत होतो.

ज्या मानानें मनुष्य आत्मसंयमन करूं शकेल, त्या मानानें तो सुखी, ज्ञानी आणि सत्पुरुष होईल. जो आपल्या दुष्ट विकारांनां आपल्या विचारशक्तींवर आणि कर्तृत्वशक्तीवर वर्चस्व करूं देईल. तो दुःखी, मूर्ख आणि अधम बनेल. ज्याला आत्मसंयमन साध्य झालें तो आपल्या जीविताचा, परिस्थितीचा व नशिबाचा 'स्वामी' झाला. तो ह्मणेल त्याप्रमाणें, घडवून आणील. आणि तो ज्या ज्या ठिकाणीं जाईल त्या त्या ठिकाणीं त्याला सुखच मिळत जाईल. जो आत्मसंयमन करीत नाहीं, त्याच्यावर त्याचीं इंद्रियें, परिस्थिति आणि नशीब हीं अंमल करितात, आणि सहज उत्पन्न झालेली वासना जर त्याला तृप्त करून घेतां आली नाहीं, तर तो हताश व दुःखी होतो. कारण, त्याची क्षणिक सुखाची सर्व मदार बाह्य उपाधींवर अवलंबून असते.

या सृष्टीमध्यें जिचा अगदीं पूर्ण नाश करतां येईल, किंवा समूळ उच्छेद होईल, अशी कोणतीहि शक्ति नाहीं. कर्तृत्वशक्तीचें स्वरूप बदलतां येईल; परंतु तिचा समूळ नाश संभवनीय नाहीं. हाडींमाशीं खिळलेल्या दुष्ट संवयी टाकून दिल्या, तरच नव्या चांगल्यांनी मार्ग खुला होईल. पुनरुज्जीवन अथवा नवीनता प्राप्त होण्यास जुनें टाकून दिलें पाहिजे. जितकी जितकी शरीरभोगाची इच्छा, निषिद्ध त्याप्रमाणेंच सुखलालसा आणि दुष्ट विचार यांपैकीं जितकें जितकें कमी करावें, तितकी तितकी उन्नतीची पुढची पायरी हस्तगत होईल. निर्बल करणाऱ्या वासनांचा जसजसा क्षय होईल, तसतसे नवजीवनदायक आनंद प्राप्त होतील. बीं जेव्हां कुजून रुजतें तेव्हांच उत्तम वृक्ष तयार होतो; अळी नाश पावते तेव्हांच कुंभारीण उत्पन्न होते.

हें स्थित्यंतर चुटकीसरसें होण्यासारखें नाहीं, व तें सुखानें किंवा अनायासेंहि होणें शक्य नाहीं. एकाद्या वस्तूची वाढ होऊन परिणतावस्था होण्याला त्याचा मोबदला ह्मणून 'प्रयत्न' आणि 'सहिष्णुता' यांची गरज असते. उन्नतीच्या मार्गांत अडथळे आणि संकटें हीं आहेतच; परंतु अशा तऱ्हेनें झालेली उन्नति कायम टिकते. अडथळे नाहींसे होतात, आणि संकटहि क्षणिक असतें. दृढमूल झालेली एकादी सवय, अथवा सतताभ्यासानें चालत आलेली मनःप्रवृत्ति हीं सोडून त्यांऐवजीं चांगली सवय किंवा सद्गुणप्रवृत्ति प्राप्त करून घेणें हें काम मोठें बिकट असून त्यामध्यें मोठी मानसिक खळबळ उडावयाची, आणि तीमधून निभावून जाण्यास दृढ निश्चय आणि धिम्मेपणा यांची फार जरूर असते; परंतु यांतच कैक लोकांची कंबर खचते, आणि मग पुनः त्यांचें "ये रे माझ्या मागल्या" हा वर्तनक्रम चालू होतो. त्यांनां आत्मसंयमन होत नाहीं, आणि तें मोठें कठिण व खडतर आहे असें ह्मणून ते मोकळे होतात. अशा रीतीनें अक्षय सुखप्राप्तीच्या मार्गाला ते मुकतात, आणि त्यांचें आत्मोद्धाराचें कार्य दृष्टिआड होतें.

षड्रिपूंच्या सेवेमध्यें गढून गेल्यामुळें त्यांतच सुखसर्वस्व आहे, असें ह्मणणारे लोक, यांनां आत्मसंयमन न करण्यामुळेंच काय सुख मिळेल तें खरें. त्यांनीं आत्मसंयमन केलें तर त्यांनां सुखप्राप्ति व्हावयाची नाहीं. मनुष्याची स्वतःवरील सत्ता जसजशी कमी होत जाईल—ह्मणजे तो जसजसा स्वैर वागूं लागेल, तसतसा तो खऱ्या सुखाला पारखा होईल, आणि त्याच्या अधःपाताची मजल इतकी होईल, कीं, तो केवळ दुःखी, दुराचारी बनून त्या सर्वांचा परिपाक ह्मणजे मनावर ज्याचा बिलकुल दाब नाहीं असा केवळ वेडा बनेल. परंतु तो जसजसें आत्मसंयमन करील, तसतसा तो खऱ्या सुखाला

आपलेंसें करील, व त्याला आनंद व सामर्थ्य हीं प्राप्त होतील. अशा तऱ्हेच्या दैवीसंपत्तियुक्त मनुष्याचें अखंड कल्याणच होईल.

आत्मसंयमन आणि सुख हीं किती परस्परावलंबी आहेत, किंबहुना त्यांचा कसा एकजीव आहे, हें एकदां ध्यानीं आलें, ह्मणजे स्वैर प्रवृत्तीनें किती तोटा आहे, आणि सुखाची कशी राखरांगोळी होते, हें आपल्या अंतःकरणानें निरीक्षण केलें, किंवा जगाकडे दृष्टि फेंकली, ह्मणजे सहज कळण्यासारखें आहे. तसेंच पुरुष आणि स्त्रिया यांच्या चरित्रांचें सूक्ष्म अवलोकन केल्यास असें ध्यानांत येईल, कीं, अविचारानें उच्चारलेला एकादा निष्ठुर शब्द, काळजाला झोंबणारें छद्मी भाषण, कपटाचें वर्तन, अंधश्रद्धा आणि मूर्खपणानें केलेला प्रतिकार हीं सर्व दुःखाला—कधींकधीं सर्वस्वनाशाला कारणीभूत होतात. तसेंच आपल्या पूर्वचरित्राचें अवलोकन केलें तर आत्मसंयमनाच्या अभावामुळें कितीतरी उद्वेग, मनस्ताप, दुःख आणि चिंता हीं आपणांला भोगावीं लागलेलीं आहेत, असें कळून येतें.

परंतु ज्यानें आत्मसंयमन केलें आहे, जो सद्वर्तनी आहे व जो योग्य तऱ्हेनें चालतो, त्याला यांपैकीं कशाचीहि उपाधि होत नाहीं. नवीन परिस्थिति उत्पन्न होऊन शुद्ध आणि सात्त्विक साधनांचा उपयोग करून सुखपरिणामी गोष्टी प्राप्त करून घेतां येतात. हातून दुष्कृत्यें न घडल्यामुळें पश्चात्तापाचा प्रसंग येत नाहीं. स्वार्थपरता कमी झाल्यामुळें चिंतेला कारण रहात नाहीं, आणि ‘ कर्तव्य ’ ह्मणून शुद्धांतःकरणानें कार्य केल्यामुळें दुःखाचा प्रसंग येत नाहीं. जो मनुष्य आत्मसंयमन करितो, आणि उद्योग करून धिम्मेपणानें फलाकांक्षा करीत राहतो, त्याला इच्छित फलप्राप्ति सहजगत्या होते. तशी स्वार्थबुद्धीनें हपापलेल्या व फलेच्छेनें अधीर झालेल्या मनुष्याला होणें दुरापास्त आहे. द्वेष, अधीरता, लोभ, स्वछंदानें

वर्तन, भलतीच महत्त्वाकांक्षा आणि अविचाराच्या वासन हीं आत्म्याची हानि करणारीं असून त्यांच्यावर भिस्त ठेवणारे लोक अज्ञानी आणि मूर्ख म्हटले पाहिजेत. प्रेम, सहिष्णुता, कृपाळुपणा आत्मनिग्रह, योग्य महत्त्वाकांक्षा आणि शुद्ध वासना हीं सत्याचीं साधनें असून त्यांनीं युक्त असलेलें जीवित आदरणीय आहे, व योग्य साधनांचा उपयोग करणारांनां ज्ञानी आणि चतुर म्हटलें पाहिजे.

उतावीळपणानें आणि स्वार्थपरतेनें काम करून जी फलप्राप्ति होते, तेंच काम शांतपणानें आणि निःस्वार्थबुद्धीनें केल्यास होणारी यशप्राप्ति फार सरस असते. सृष्टीला उतावीळपणा सोसत नाहीं. सृष्टीमध्यें सर्व गोष्टींनां योग्य कालीं पूर्णावस्था प्राप्त होते. सत्य हें मारूनमुटकून स्वाधीन होणारें नाहीं. त्याचेहि कांहीं नियम आहेत, व ते पाळले पाहिजेत. अविवेक आणि क्रोध यांहून गर्ह्य असें दुसरें कांहीं नाहीं. बाह्यवस्तुजातावर आपला पूर्ण अंमल बसणें शक्य नाहीं; परंतु आत्मदमन मात्र आपणांला करितां येईल, हें मनुष्याला समजलें पाहिजे. दुसऱ्याच्या इच्छाशक्तींनां आपणांला वांकवितां येणार नाहीं; परंतु आपली इच्छाशक्ति मात्र आपणांला पाहिजे तशी वळवून नियंत्रित करतां येईल. ज्याचा सत्पक्ष आहे, त्याला सर्व वस्तु अनुकूल होतात, व ज्यानें आत्मसंयमन केलें त्याच्या उपदेशाची लोक आदरानें अपेक्षा करितात.

ज्या मनुष्याला अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं देखील आत्मसंयमन करितां येत नाहीं, त्याला दुसऱ्याचा मार्गदर्शक होणें, किंवा दुसऱ्यांवर हुकमत चालवितां येणें शक्य नाहीं. ही अगदीं साधी आणि त्रिकालाबाधित सत्य गोष्ट पुष्कळांनां समजलेली नसते. कानफ्यूशिअस याच्या नैतिक आणि राजकीय उपदेशांमधील हें अगदीं मुख्य सूत्र आहे, कीं "ज्याला दुसऱ्यावर हुकुमत चालवावयाची असेल त्यानें

आत्मनिग्रह करण्यास शिकलें पाहिजे." थोडासा प्रसंग आल्याबरोबर ज्याचें देहभान सुटतें, मन संशयग्रस्त होऊन जे शिव्याशापांचा वर्षाव करूं लागतात आणि क्रोधवश होतात, त्यांच्या हातून श्रेष्ठ प्रकारचीं किंवा जबाबदारीचीं कामें व्हावयाचीं नाहींत, व अशा लोकांनां आपला संसार किंवा धंदा यांतहि यश येत नाहीं. आत्मसंयमनाचा अभाव ह्मणजे मूर्खपणा, आणि मूर्खपणाचा शहाणपणापुढें टिकाव कसा लागावा ?

जो आपले भ्रमण करणारे आणि उच्छृंखल विचार यांचा निग्रह करून त्यांनां आहारीं आणण्याचा अभ्यास ठेवितो, त्याला उत्तरोत्तर शहाणपण प्राप्त होतें, आणि त्याला एकदम जरी सुखसर्वस्व लाधलें नाही तथापि तो सुखाचा पाया घालतो, असें ह्मणावयास हरकत नाहीं; व अशा तऱ्हेनें त्याची प्रगति होत गेली ह्मणजे एक दिवस केव्हां तरी असा येईल, कीं, तो पूर्ण सुखोपभोग घेऊं लागेल. आत्मसंयमनापासून ज्ञानाची उत्पत्ति आहे, व ज्ञान ह्मणजेच सुख आणि शांति होय.

आत्मसंयमन करणें ह्मणजे व्यर्थ हानि किंवा शुष्क उपव्याप नव्हे. आत्मसंयमनांत थोडासा त्याग करावा लागतो, हें खरें; परंतु तो त्याग 'अविनाशि' आणि 'सत्य' गोष्टींची प्राप्ति व्हावी म्हणून 'क्षणभंगुर' आणि 'असत्य' गोष्टींचाच होय. सुखोपभोगांला अर्जा फांटा द्यावयाचा नसतो, तर ते एका दृष्टीनें वृद्धिंगत होत असतात. जीवित म्हणजेच सुखोपभोग, असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु सुखोपभोगाची अनिवार तृष्णा हीच काय ती हानीला कारण होते. नित्य नव्या सुखोपभोगाची इच्छा करणाऱ्या प्राण्याहून अधिक दुःखी प्राणी कोठें तरी सांपडेल काय ? तसेंच, जो आत्मसंयमनानें नित्य तृप्त, शांत आणि ज्ञानी झाला आहे त्याहून अधिक

भाग्यवान् कोणी आहे काय? अत्याहारी, मद्यपि आणि ज्याचें जीवित केवळ विषयोपभोगासाठींच आहे अशा कामी मनुष्याला अधिक प्रकृतिस्वास्थ्य आणि सुख मिळेल, किंवा जो युक्ताहारविहारी असून देहधर्म पाळण्यासाठी जरूर तेवढ्याच गोष्टींचा उपभोग घेणारा, त्याला अधिक मिळेल? एकदां एक गृहस्थ रसदार व ताजें काढलेलें सफरदळ खात होता, त्याला पाहून दुसरा म्हणतो "अशा अमृततुल्य फळाची गोडी जर मला चाखतां आली असती, तर मी आपणाला मोठा भाग्यवान् समजलों असतों!"

त्यावर फळ खाणारा म्हणतो "कां बुवा, असें कां म्हणतोस?"

दुसरा उत्तर करितो "काय सांगूं बाबा, यथेच्छ मद्य पिऊन आणि तंबाखू ओढून माझें तोंड इतकें बेचव झालें आहे, कीं, अशा फळाची लज्जत मला समजत नाहीं!"

भ्रामक सुखाच्या लालसेनें मनुष्य आयुष्यांतील अविनाशी सुखांना मुकतात, हें उघड आहे.

जसजसें इंद्रियदमन करावें, तसतसें आरोग्य, सौख्य आणि शक्ति हीं प्राप्त होतात, आणि जो आपले विचार नियंत्रित करितो, त्याचें अत्यंत पारमार्थिक कल्याण होऊन त्याला अविनाशी आनंद आणि सामर्थ्य हीं प्राप्त होतात. आत्मसंयमनानें नुसतें सौख्यच लाभतें असें नव्हे, तर ज्ञानविज्ञान हींहि प्राप्त होतात. अज्ञान आणि अहंता यांचीं द्वारें जसजशीं बंद होत जातील, तसतशीं ज्ञान आणि विवेक यांचीं कपाटें खुलीं होतात. जेवढा सद्गुण अंगीं बाणला तितकें ज्ञान मिळालें असें समजावें. ज्याचें मन ज्ञानयुक्त झालें, तें शुद्ध झालें. ज्याला उत्तम आत्मसंयमन साध्य झालें, त्याचें जीवित सफल झालें असें समजावें.

पुष्कळ लोक 'सद्गुणांचा एकांगीपणा' असतो असें म्हणतात, असें ऐकण्यांत येतें; परंतु मनुष्यानें वस्तुतः जी गोष्ट सोडून दिली तिचा

त्याला मनःपूर्वक तिटकारा आला म्हणून त्यानें ती टाकून दिली नसेल, अर्थात् त्या गोष्टीबद्दल त्याची मूळ इच्छा जर नाहींशी झाली नसेल, तर सद्गुण अंगीं बाणला असें कसें म्हणतां येईल ? या दृष्टीनें सद्गुणांचा एकांगीपणा कदाचित् म्हणतां येईल. खरा निग्रही मनुष्य केवळ विषयोपभोगांचा त्याग करतो असें नव्हे, तर त्यांच्याबद्दल उत्पन्न होणाऱ्या वासनेचेंच पूर्ण निर्मूलन करितो; त्याची दृष्टि उन्नतीच्या मार्गावर असते, त्याची पिछेहाट होत नाहीं. अशा रीतीनें त्याला नवीन ऐश्वर्य, नवीन तेज आणि श्रेष्ठ आनंद यांचीं द्वारें पदोपदीं खुलीं होतात.

आत्मसंयमनाच्या योगानें होणारी उन्नति पाहून आपण आश्चर्यचकित होऊन जातों. सत्याचा विकास पाहून मन थक्क होऊन जातें. आत्मसंयमनानें होणाऱ्या आनंदाचें श्रेष्ठत्व मनांत येऊन फार समाधान होतें. त्यामुळें मिळणाऱ्या शांतीनें आणि ऐश्वर्यानें आह्मी आनंदसागरांत पोहूं लागतों.

आत्मसंयमनाच्या प्रयत्नांमध्यें यश आलें ह्मणजे मोठी लढाई जिंकावी असा आनंद होतो. तसेंच विकसित आणि वृद्धि पावणाऱ्या सामर्थ्याची जाणीव होते. दैवी ज्ञानप्राप्तिरूपी अविनाशी संपत्तीचा लाभ होतो, आणि जनतेच्या कल्याणासाठीं अहर्निश प्रयत्न करण्याचें सामर्थ्य अंगीं येऊन त्याचा अक्षय आनंद प्राप्त होतो. आत्मसंयमन थोडेंबहुत साध्य करणाराला देखील सामर्थ्यप्राप्ति, यशोलाभ आणि आनंद यांची जोड जशी होईल, तशी अविवेकी आणि अनुद्योगी मनुष्याला कधींहि लभ्य होणें नाहीं; आणि ज्याला पूर्ण आत्मसंयमन साध्य झालें तो सर्वथा मुक्त होईल, त्याचीं सर्व संकटें नाहींशीं होऊन त्याचें दुःख नांवाला देखील राहणार नाही. तो सर्वैश्वर्यसंपन्न होऊन आनंदातिशयानें विश्वावलोकन करून अखंड सुखास्वाद घेत राहील.

# निरुपाधित्व आणि मुक्ति.

शरीरावर मोठा भार घेतला ह्मणजे काय स्थिति होते, व तो भार दूर झाला ह्मणजे कसा बरेपणा वाटतो, हें प्रत्येकाला माहीत आहेच. तसेंच नानाप्रकारच्या वासना, परस्परविरोधी असंख्य मतें, आणि नानातऱ्हेचे मनोरथ यांनीं काढून केलेलें जीवित चांगलें, किंवा ज्याच्या इच्छा फक्त देहधर्म भागण्याइतक्याच आहेत, आणि आपल्या अस्तित्वाच्या हेतूबद्दल जो शांतपणें चिंतन करितो, आणि ज्यानें वितंडवाद व मनोराज्य यांनां फांटा दिला आहे अशा मनुष्याचा जीवितक्रम चांगला, याचा परिचय प्रत्येकाला अनुभवानें आहेच.

पुष्कळ लोकांचीं घरें, कपाटें, फडताळें हीं असंख्य निरुपयोगी वस्तूंनीं आणि अडगळीनें भरून गेलेलीं असतात, असें आपल्या दृष्टीला पडतें. कांहीं लोकांनां ही अडगळ जमविण्याची हांव इतकी अनिवार असते, कीं, त्यांच्या घरांतील केरसुद्धां तीमुळें नीट निघत नाहीं, आणि मग उंदीर, घुशी व इतर जीवजिवडा यांनां चांगलेंच फावतें. बरें, या अडगळीचा कांहीं उपयोग आहे ह्मणावें, तर तसेंहि नसतें. परंतु ती काढून टाकण्याचें मात्र त्यांच्या जिवावर येतें. ती काढून टाकली तर जीवजीवड्याचा त्रासहि चुकेल; पण छे, ते ती तशीच बाळगून ठेवतील! दुसऱ्या कोणाजवळ आपल्यासारखा वस्तूंचा संग्रह नाहीं असें समजून आलें ह्मणजे त्यांनां विशेषच आनंद वाटतो, व आपल्या वस्तूंच्या संग्रहाचा त्यांनां मोठा अभिमान व भूषण वाटतें, आणि '**कोकालोफलदायकः**' या न्यायानें

त्यांतील एकाद्या जिनसाची मोठी किंमत येईल, निदान त्यांतील एकाद्या वस्तूनें कांहीं पूर्वस्मृति जागृत होतील, व तेवढ्यांतच त्यांनां मोठा संतोष वाटतो.

परंतु ज्या घरांत टापटीप, व्यवस्था आणि पद्धत आहे, त्या घरांत अशा जळमटें वाढविणाऱ्या, त्रासदायक आणि चिंताग्रस्त करणाऱ्या जिनसांनां थाराच मिळत नाहीं; आणि यदाकदाचित् निरुपयोगी वस्तु जमल्याच तर वेळींच त्या काढून टाकून, किंवा कचऱ्यांत फेकून देऊन घर स्वच्छ, रमणीय आणि व्यवस्थित ठेविलें जातें.

याचप्रमाणें पुष्कळ लोक आपल्या मनांत अशी नासकीकुसकी घाण भरून ठेवीत असतात, आणि तिला अगदीं चिकटून बसतात, व ती नाहींशी होऊं नये म्हणून फार जपतात, आणि ती कमी झाली तर त्यांनां फार दुःख होतें! अतृप्त वासना, निषिद्ध सुखसेवनाची किंवा अधर्माचरणाची अनिवार प्रवृत्ति, चमत्कार, भुतेंखेतें, टाणेटोणे जलदेवता, स्थलदेवता आणि अशाच परस्परविरोधी गोष्टी व नाना-पंथ, नाना मतें यांत मनुष्य इतका गुरफटून गेलेला असतो, कीं, जीविताचा खरा हेतु काय आहे, याची जाणीव त्यांच्या माऱ्यापुढें पार नाहींशी होते.

तेव्हां अशा मनावर गंज चढविणाऱ्या आणि घोटाळ्यांत घालणाऱ्या गोष्टींचा त्याग करणें, व आवश्यक आणि अविनाशी अशांचाच अवलंब करणें, यालाच निरुपाधित्व अथवा उपरति म्हणतात.

या जगांत शाश्वत काय आहे? आवश्यक काय आहे? सद्गुण हेच शाश्वत आहेत, सद्गुणच अविनाशी आहेत; आणि सदाचार किंवा सच्छील हें आवश्यक आहे. अनावश्यक गोष्टी सोडून दिल्या,

आणि जीविताचें खरें रहस्य समजून त्याला अनुसरून वर्तन घडलें, ह्मणजे जीवित अगदीं साधें–सोपे नियमबद्ध असून त्या नियमांचें आचरण करावयाला मात्र कठीण–आहे, असें समजून येतें. सर्व थोर पुरुषांनीं आयुष्याची अशीच सुगम व्याख्या करून ठेवलेली आहे. बुद्ध ह्मणतो ' आयुष्य ह्मणजे आठ मुख्य सद्गुण असून त्यांचें आचरण केलें असतां पूर्ण ज्ञानप्राप्ति होते, आणि या आठ सद्गुणांचें सार ह्मणजे **'सर्वांभूतीं दया'** होय. कनफ्यूशिअस ह्मणतो' 'ज्ञानप्राप्तीची पूर्णावस्था पांच सद्गुणांनींच होते,' आणि त्याचेंहि सार तो ह्मणतो **'सहानुभूति'** किंवा **'भूतदया'** होय. जीझस ह्मणतो ' आयुष्य ह्मणजे **'प्रेम'** होय. ' भूतदया, सहानुभूति किंवा प्रेम हीं सर्व एकाच मनोधर्माचीं द्योतक आहेत. त्यांत साधेपणा तरी किती भरलेला आहे ! परंतु ज्याला या शब्दांच्या श्रेष्ठत्वाची आणि रहस्याची पूर्ण ओळख झालेली आहे असा एकहि मनुष्य आढळत नाहीं ! कारण, ज्याला ह्मणून एकदां त्यांचें पूर्ण ज्ञान झालें त्याच्या आचरणांत ते उतरलेच पाहिजेत, आणि असाच मनुष्य 'पूर्ण पुरुष', ' अव्यंग ' आणि 'दैवी सामर्थ्ययुक्त' बनेल–नराचा नारायण होईल. मग त्याच्या ठायीं ज्ञान, चातुर्य आणि सद्गुण यांची कमतरता राहणार नाहीं. जेव्हां कोणताहि मनुष्य आपल्या हातून सदाचरण घडावें अशी इच्छा धरून त्याप्रमाणें वर्तन करूं लागतो, तेव्हां आपल्या मनावर किल्मिषाचीं कितीतरी पुटें चढलीं आहेत हें त्याला समजून येतें, आणि हेंच मानसिक किल्मिष त्याला साफ काढून टाकावयाचें असतें. अशा तऱ्हेच्या वर्तनक्रमामुळें मनुष्याची श्रद्धा, सहिष्णुता, प्रेम, विनय, बुद्धि आणि इच्छाशक्ति हीं चांगलींच कसोटीला लागून मन पूर्ण शुद्ध व उपाधिरहित होईपर्यंत त्याला पराकाष्ठेची व्यथा सोसावी लागते. मन, घर किंवा आपल्या धंद्याची जागा

यांची शुद्धि करणें हें क्षुल्लक अगर सोपें काम नाहीं; मात्र तें साध्य झालें म्हणजे सुख आणि समाधान हीं प्राप्त होतात.

जगांतील सर्व चेतन अगर अचेतन वस्तु अथवा मानसिक क्रिया यांच्या अस्तित्वाचे नियम फार साधे आणि प्रमाणशुद्ध आहेत. ज्ञानी लोकांचें आयुष्यहि अगदीं साध्या नियमांनीं युक्त असतें. ज्याच्या आयुष्यामध्यें प्रेम हेंच मुख्य तत्त्व आहे, त्याची वागणूक चोहोंकडे त्याच मुख्य तत्त्वाला धरून एकसारखीच दृष्टीला पडेल. त्याचा प्रत्येक विचार, उच्चार, आचार अथवा कृति यथाकाल यथोचित होऊन त्यांमध्यें विरोध किंवा घोटाळा दृष्टीला पडणार नाहीं. '**चित्ते-वाचि क्रियायां च महतामेकरूपता.**

साधु व ज्ञानी म्हणून प्रसिद्ध झालेल्या एका वुद्ध तिर्थंकराला कोणीं एका पंडितानें प्रश्न केला "बुद्धधर्माचें मुख्य लक्षण काय आहे?"

वुद्ध साधु उत्तर करितो "दुष्कर्मनिवृत्ति व परहित करणें हीं बुद्ध धर्माचीं मुख्य लक्षणें आहेत."

पंडित विचारितो "तुम्ही सांगतां हें लहान पोराला देखील माहीत आहे.तें तुम्हांला मीं विचारिलें नाहीं.मला असें पाहिजे, कीं, बुद्धधर्मां-तील मोठी गूढ,मोठी सूक्ष्म आणि अतिशय महत्त्वाची गोष्ट कोणती?" "मोठी गूढ, मोठी सूक्ष्म आणि अतिमहत्त्वाची गोष्ट म्हणजे दुष्कर्म न करणें व परहित साधणें. आतां हें खरें आहे, कीं, ही गोष्ट अगदीं नेणत्या मुलालाहि समजते; परंतु केंस पिकलेल्या म्हाताऱ्याला देखील त्याप्रमाणें आचरण करितां येत नाहीं."

यावर टीकाकार म्हणतो, कीं, त्या पंडिताला बौध्य धर्माचें रहस्य किंवा सत्य स्वरूप पाहिजे होतें अशातला भाग नसून कांहीं तरी क्लिष्ट तत्त्वसिद्धांत पाहिजे होता, कीं, ज्याचा कीस काढतांकाढतां सिद्धांताची मालिका उत्पन्न होऊन आपल्या बुद्धीला

थोडें तरी घर्षण मिळावें, आणि आपल्या विद्वत्तेचें प्रदर्शन करण्यास सांपडावें.

एकदां एक मोठा तत्ववेत्ता दर्पोक्तीनें आह्मांला म्हणाला "आमची तत्त्वज्ञानपद्धत सर्व जगांत अगदीं पूर्णावस्थेला पोंचलेली आणि अत्यंत बिकट अशी आहे." ती किती बिकट आहे, याचा आम्हांला प्रत्यक्ष अनुभवहि घेतां आला; कारण, त्यांत एकदां डोकें घातलें म्हणजे मन इतकें गोंधळून जातें, व त्यांतून बाहेर पडून जीविताबद्दल विचार, आणि साध्या व सात्विक मनोवृत्तींचा लाभ होण्यास अतिशय त्रास पडतो. तेव्हां आम्हीं मनाशीं अशी खूणगांठ बांधली, कीं, अशा नुसत्या 'घटपटादि खटपट' करण्यामध्यें आयुष्याचा नाश करून घेण्यापेक्षां अक्षय आणि अविनाशी अशा सद्गुणांचें अहर्निश चिंतन करून त्याच्या प्राप्त्यर्थ आपल्या आयुष्याचा व बुद्धीचा उपयोग करणें किती तरी श्रेयस्कर आहे.

अभिमान आणि दुराग्रह, तसेंच आपण ह्मणूं तेंच सत्य असा पोकळ दर्प, हीं अगदीं सोडून दिलीं पाहिजेत. अज्ञान आणि मूर्खपणा यांनां आह्मी मुळींच किंमत देत नाहीं. शिक्षण हें वस्तुतः चांगलें आहे; परंतु नुसतें पुस्तकीज्ञान कांहीं कामाचें नाहीं; परंतु त्या शिक्षणाचा उपयोग मनुष्यजातीच्या उन्नतीकडे व कल्याणाकडे केल्यास तेंच शिक्षण एक जागृतसामर्थ्य बनतें. त्याला जर विनयाची जोड असेल, तर तें उत्कृष्ट गोष्टी साध्य करण्याचें एक अतीशय तेजस्वी शस्त्र होतें. वर सांगितलेला वृद्ध साधु हा त्याच्या गर्विष्ठ पृच्छकाहून कमी विद्वान् होता, असें नव्हे; परंतु त्याच्या अंगीं विशेष साधेपणा असून तो शहाणा होता. 'गृहित गोष्टी' या गृहीत गोष्टीच आहेत; वस्तुस्थिति नव्हे, असें समजून चालल्यास घोटाळा होण्याचें कारण नाहीं. तथापि ज्ञाते लोक गृहित गोष्टी वर्ज

करून सत्य गोष्टींचेंच आचरण करितात. त्यामुळें त्यांच्या अंगीं दैवी सामर्थ्य येऊन त्यांना पूर्ण निरुपाधित्व, पूर्णज्ञान व मोक्षप्राप्ति होते.

निरुपाधित्वाचा पूर्ण आनंद व अधिकार प्राप्त व्हावा अशी इच्छा असेल तर विवेक वाढविला पाहिजे, आणि या विवेकाचें धोरण उदात्त व उपयुक्त ध्येयाकडे असून आयुष्याच्या इतिकर्तव्यते-मध्यें त्याचें पर्यवसान झालें पाहिजे. उगाच वायफळ तर्कवाद करण्यांत त्याचा दुरुपयोग होऊं नये.

उपाधिरहित आयुष्यक्रम हा सर्व दृष्टींनीं अगदीं साधा असतो; कारण, त्याचें मुख्य प्रेरक जें मन तें शुद्ध आणि निश्चयी बनलेलें असतें. सात्त्विक वृत्तीचा पाया सत्यावर उभारलेला असतो. खाण्या-पिण्याचा अतिरेक, पोषाखाचा डामडौल, भाषणांत अतिशयोक्ति, आणि कर्तव्यांत कृत्रिमता; तसेंच व्यर्थ मनोराज्य आणि पांडित्य दाखविण्याकरितां केलेलें विचारांचें प्रदर्शन, हीं सर्व सद्गुण अंगीं बाणावे अशी इच्छा असेल तर सोडून दिलीं पाहिजेत. तसेंच, आयुष्यांतील कर्तव्यकर्मे निःस्वार्थपणानें करण्याची बुद्धि उत्पन्न झाली पाहिजे. अशा रीतीनें कर्तव्यकर्मे केलीं म्हणजे त्यांच्यावर नवा सत्याचा प्रकाश पडूं लागतो, आणि जीविताची आजतागायत अज्ञात असलेलीं मूलभूत तत्त्वें दृष्टीसमोर स्पष्ट दिसूं लागतात, आणि अर्थवाद करणारे पंडित लोक ज्या सत्यस्वरूपाबद्दल वाद करून तर्कवितर्क काढीत असतात तें प्रत्यक्ष आपणाला अवगत होतें.

सात्विक वृत्तीचे, शुद्ध मनाचे, सद्गुणी आणि ज्ञाते यांचे सर्व संशय विच्छेद पावतात, आणि भविष्यकाळाबद्दल किंवा अज्ञात आणि अज्ञेय यांबद्दलच्या त्यांच्या सर्व शंका पार लयाला जातात. प्रत्यक्ष ‘ प्राप्तकर्तव्या’कडेच व ‘ ज्ञात ’ आणि ‘ ज्ञेय ’ गोष्टींवरच

त्यांची सर्व भिस्त असते. प्रत्यक्ष गोष्टींची जागा ते कल्पनामय गोष्टीला घेऊं देत नाहींत. सद्गुण हेच शाश्वत टिकणारे आहेत, अशी त्यांची पूर्ण खात्री होते. सत्याचा प्रकाश उज्ज्वल असून त्याच्या योगानें आयुष्यांतील कर्तव्याचें ज्ञान होतें, आणि अज्ञेयाच्या क्लिष्ट मार्गांतून त्यांनां पुढील दैवी सुखाची छाया दिसूं लागते, व मग ते अखंड शांतिसुखाचा लाभ घेतात.

सात्विकपणाचें काम अप्रतिहत चालू राहून अखेर तेंच मोठें ऐश्वर्य आणि सामर्थ्य बनतें. शंका, कपट, अपवित्रता, नैराश्य, कार्पण्य, संशय आणि भीति हीं पार लयाला जातात, त्यांची उपाधि होत नाहीं, आणि अशा तऱ्हेनें मुक्त झालेला मनुष्य सामर्थ्यवान्, आत्मतृप्त, शांत, दांत आणि पवित्र होऊन शुद्धांतःकरणानें मुक्तिसुखाचा लाभ घेतो, व अखेर त्याला स्वर्गप्राप्ति होते.

# सद्विचार आणि चित्तस्वास्थ्य.

जीवित हें सुष्टदुष्ट अशा संमिश्र प्रवृत्तींचा समवाय आहे, आणि त्या सर्वांचा उगम एकाच प्रवृत्तीपासून–विचार-प्रवृत्तीपासून–होतो. मनुष्याची परीक्षा त्याच्या विचारांवरून होते; ह्मणून सद्विचार करणें ही आयुष्यांतील विशेष महत्त्वाची गोष्ट होय. सूज्ञ मनुष्य आणि मूर्ख मनुष्य यांच्यामध्यें भेद इतकाच, कीं, सूज्ञ मनुष्य आपल्या विचारांनां ताब्यांत ठेवतो, आणि मूर्ख मनुष्य आपल्या विचारांचा दास बनतो. सूज्ञ मनुष्य आपल्या विचारांची दिशा आणि क्रम हीं ठरवून ठेवून बाह्य उपाधींनीं आपल्या उद्दिष्ट हेतूंपासून आपल्या विचारांनां ढळूं देत नाहीं; परंतु मूर्ख मनुष्य बाह्य उपाधींनीं उठणाऱ्या उच्छृंखल तरंगांचा गुलाम बनतो, आणि त्याचें सर्व आयुष्य छांदिष्टपणा, लहरी स्वभाव आणि विकार-वशता यांचें खेळणें होऊन जातें.

कुविचार किंवा विचाराची खबरदारी न घेणें–ज्याला अविवेक हें नांव आहे–हा अपयश, दुष्टकृत्यें आणि दुःख यांचें माहेरघर आहे. **"अविवेकः परमापदां पदम्"** दुष्ट विचारांचा उपशम स्तोत्र-पाठानें, व्रतवैकल्यांनीं किंवा दानानें–कशानेंहि व्हावयाचा नाहीं! सद्विचारानेंच दुष्ट आयुष्यक्रमाची शुद्धि होईल. मनुष्यें व वस्तुजात यांबद्दल शुद्ध मन असेल, तरच चित्तस्वास्थ्य आणि शांति यांचा लाभ होईल.

ज्याचें अंतःकरण व बुद्धि हीं उदात्त विचारप्रवृत्तीमध्यें गढून गेलेलीं आहेत, त्यालाच श्रेयःसाधन करितां येईल. ज्याला श्रेयः-

साधनाची इच्छा असेल, त्यानें पुढें लिहिल्याप्रमाणें वर्तन ठेविलें पाहिजे. त्याचे विचार तर्काला धरून, योग्य, सयुक्तिक आणि सप्रमाण असले पाहिजेत. विचारांची दिशा ठरवून ठेवून ज्ञानाच्या मजबूत पायावर आयुष्यक्रम ठरविला पाहिजे. त्यानें नुसतें प्रेमळ असून उपयोगी नाहीं; तर सयुक्तिक प्रेमळ असलें पाहिजे. ह्मणजे प्रेमळपणा आपण कां दाखवितों, याचें त्याला ज्ञान झालें पाहिजे. त्याचा प्रेमळपणा एकसारखा चलबिचल न होतां टिकला पाहिजे. घटकेंत दयाळू, घटकेंत तामसी होऊन सूड उगविण्याची किंवा कठोरपणाची प्रवृत्ति होतां कामा नये. त्यानें कशाहि बऱ्यावाईट प्रसंगांत आपलें सद्वर्तन सोडतां कामा नये. मनाला मोहाचा प्रसंगच आला नाहीं, अशा स्थितींत सद्वर्तनी राहणाराला सद्वर्तनी कोणीहि ह्मणणार नाहीं. '**सुस्थे कोवा न पंडितः**' मनाला मोह पडण्याचे हजारों प्रसंग येत असूनहि ज्याचें वर्तन सन्मार्गच्युत न होतां ज्याचे सद्गुण उज्ज्वल तेजानें झळकत असतात, तोच खरा सद्गुणी होय. सद्वर्तनी मनुष्यानें लोकांच्या निंदास्तुतींनीं अथवा दुर्दैवाच्या फेऱ्यानें आपल्या मनुष्यत्वापासून च्युत होतां कामा नये. दुर्दैवाचे फेरे अथवा संकटें यांमध्यें धीर देणारें असें सद्वर्तन हेंच त्याचें आत्यंतिक अधिष्ठान किंवा शरणस्थान असलें पाहिजे.

सद्गुण केवळ अंतःकरणाचे नसून बुद्धीचेहि आहेत. शुद्ध बुद्धि नसेल तर शुद्धांतःकरणाचाहि टिकाव लागावयाचा नाहीं. मनोविकारांसारखे बुद्धीचेहि विकार आहेत. विषयेच्छा ही जशी प्रेमाची दुष्ट प्रवृत्ति आहे, तशीच व्यर्थ मनोराज्य करणें हा बुद्धीचा दुर्गुण आहे. मनोराज्याच्या भराऱ्या मोठ्या गोड असतात; परंतु त्यामुळें शांतीचा लाभ होत नाहीं, आणि मनोराज्यानें कंटाळलेलें मन अखेर तत्त्वशोधाकरितां वस्तुस्थिति आणि नीतिसिद्धांत यांचाच

आश्रय करूं लागतें. ज्याप्रमाणें आकाशांत उंच भराऱ्या मारणारा पक्षी अखेर थकून विश्रांतिसाठीं कड्यावर असलेल्या आपल्या घरट्याचा आश्रय करितो, तसा कल्पनामय भराऱ्या मारणारा पंडित मनाची तळमळ नाहींशी होण्याकरितां आणि ज्ञानाकरितां सद्गुणांचाच आश्रय करितो.

सद्गुणांचें पूर्ण आकलन होणें, आणि त्याप्रमाणें शुद्ध आचरण घडणें, याला बुद्धीची पूर्ण तयारी झाली पाहिजे. व्यर्थ तुषकंडण अथवा निष्फळ वादविवाद यांमध्यें बुद्धीचा ऱ्हास न करितां सद्वर्तन आणि ज्ञानप्राप्ति यांकडेच बुद्धीचा उपयोग झाला पाहिजे. विवेकी पुरुषाला ' सत्य ' काय व ' आभास ' काय यांतील भेद अंतर्यामीं समजला पाहिजे. आपल्या प्रत्यक्ष ज्ञानाची मजल कोठ-पर्यंत आहे, हेंहि त्याला कळणें अवश्य आहे. आपणास कशाचें ज्ञान झालें आहे याची जाणीव त्याला असली पाहिजे. तसेंच आप-णास कोणत्या गोष्टीचें ज्ञान झालें नाहीं, हेंहि त्याला समजलें पाहिजे. प्रत्यक्ष ' वस्तुस्थिति ' आणि वस्तुस्थितिबद्दल ' तर्क, ' तसेंच नुसती ' समजूत' आणि 'प्रत्यक्ष ज्ञान ' आणि 'सत्य' व ' असत्य ' यांच्यामधील भेद त्याला समजले पाहिजेत. मनाला सत्य गोष्टीचें आकलन केव्हां होतें, आणि जीवित उदात्त होण्याकडे मनःप्रवृत्ति केव्हां होते, हें शोधून काढण्याच्या कामांत त्यानें अतिशय सूक्ष्म विचारी बनावें, आणि कडक अशी मनाची तपासणी करावी. अशा तऱ्हेनें कांहीं काळ आत्मशोधन केलें असतां आपलें ज्ञान अगदीं संकुचित असून अपुरें आहे, असें समजून येऊन मनुष्यास मोठें आश्चर्य वाटेल. तथापि ज्ञान जरी अगदीं थोडें आहे असें असलें, तथापि जें ज्ञान आहे तें अगदीं बावन्नकशी सोन्याप्रमाणें निर्दोष आहे–सतेज आहे, असें समजून आनंदहि वाटेल, आणि

हजारों मण अशोधित धातूंचा संग्रह, कीं, ज्यांतून एक माशाभर सोनें काढणें कठिण आहे, आणि एवढ्या मोठ्या राशींत तें असूननसून सारखें आहे, असा संग्रह बरा, कीं, त्यांतून सोनें तेवढें काढून घेऊन बाकीचें फेंकून देणें बरें ? ज्याप्रमाणें खाण खणणारा माणूस हजारों टोपल्या माती एक रति मात्र हिऱ्याकारितां उलथोपालथी करीत असतो, त्याचप्रमाणें अध्यात्मिक ज्ञानसंप्राप्तीकारितां समुत्सुक झालेला मनुष्य आपल्या मनाचें सर्व किल्मिष, मतमतांतरें, नानातऱ्हेच्या भावना, मनोरथ आणि कल्पनामय सुखें, सत्यज्ञानरूपी रत्न प्राप्त होण्याकारितां पार धुऊन टाकतो, आणि असें सत्यज्ञान झालेला मनुष्य ज्ञाता व पूर्ण विवेकी होतो. **'तापल्यावांचोनि नव्हे अलंकार। विटोनियां सार उरलें तें॥'**

या आत्मशोधनाच्या तापानें अखेर जें साररूप ज्ञान शिल्लक राहतें, तें व सद्गुण यांच्यामध्यें फारसा भेद नाहीं. सद्गुण व हें ज्ञान हीं निरनिराळीं म्हणतां येणार नाहींत. या ज्ञानाच्या शोधांतच साक्रेटीस याला सद्गुणांचें बीज सांपडलें. साधुसंतांचे प्रासादिक बोल या सद्गुणाचीं सूत्रें होत. ज्ञान व सद्गुण हीं एकमेकांपासून वेगळीं झालीं, कीं, सर्व शहाणपण लयाला गेलें असें समजावें. मनुष्याला ज्या गोष्टीचें ज्ञान आहे, त्याच गोष्टीचें तो आचरण करितो. ज्या गोष्टीचें त्याला ज्ञान नाहीं, ती गोष्ट त्याच्या आचरणांत दिसून येत नाहीं. एकादा मनुष्य 'प्रेम' या विषयावर चांगलें निरूपण करील, किंवा मोठा निबंध लिहील; परंतु कुटुंबांतील मनुष्यांशीं जर तो निष्ठुरपणानें वागत असेल, किंवा आपल्या शत्रूबद्दल तिरस्कार प्रदर्शित करीत असेल, तर त्याला 'प्रेम' या विषयाचें कांहीं ज्ञान झालें आहे, असें म्हणतां येईल काय ? पूर्ण ज्ञानी मनुष्याच्या अंतःकरणांत दया व शांति नेहमीं वास करीत असतात, आणि त्या दये

पुढें नुसत्या शब्दपंडिताचें पांडित्य फिकें पडतें. ज्याचें अंतःकरण द्वेषापासून मुक्त झालें त्यालाच चित्तस्वास्थ्य ह्मणजे काय, हें समजणार आहे, व तोच **'अद्वेष्टा सर्वभूतानाम्'** असा होऊं शकतो. दुष्ट अंतःकरणापासून निघालेल्या सद्गुणाच्या मतलबी व्याख्येवरून मनुष्याचें अज्ञान मात्र प्रगट होतें. नुसती माहिती गोळा करणें ह्मणजे ज्ञान नव्हे. ज्ञानाचा अर्थ याहून फार भिन्न आहे. सद्गुण आंगीं पूर्ण बाणल्यामुळें प्राप्त होणारें जें ज्ञान तें दैवी ज्ञान होय. आपण अज्ञानी आहों, आपल्या कल्पना भ्रामक आहेत असें जाणून त्या भ्रमापासून नम्रतेनें बुद्धीला मुक्त करणें याच्यायोगानें बुद्धि कुशाग्र होऊन अंगीं मोठें सामर्थ्य येतें. जो शुद्ध आहे त्याच्याच आंगीं सात्त्विक प्रेमभाव उत्पन्न होईल, व त्याला कशाचेंहि भय वाटणार नाहीं; ह्मणून मन शुद्ध पाहिजे.

दुष्कृत्यांत मग्न झालेला मनुष्य आपल्या कृतीनें जगजाहीर झालेला असतो, आणि सद्विचारी मनुष्य आपल्या सद्गुणांनीं प्रसिद्ध असतो. कुविचाररत मनुष्याला दुःखशोकांनीं पीडा होत असते, व त्याला चित्तस्वास्थ्य कधींहि मिळत नाहीं. त्याला नेहमीं वाटत असतें, कीं, इतर लोक आपला घात करण्याला, आपल्याला त्रास देण्याला, आपल्याला फसविण्याला, आपली मानहानि करण्याला व आपला सर्वस्वी नाश करण्याला टपलेले आहेत. सद्वर्तनाचा पाठिंबा किंवा धीर किती मोठा आहे, याची त्याला कल्पनाहि नसल्यामुळें स्वतः:बद्दल कोत्या विचारांखेरीज अन्य कांहीं त्याच्या ध्यानीं येत नाहीं, आणि ह्मणून तो संशय, द्वेष, सूड, जशास तसें या प्रकारांचा आश्रय करितो, आणि आपल्या दुर्गुणाच्या खाईमध्यें पिचत राहतो. त्याची कोणी निंदा केली तर हा दुसऱ्याची निंदा करूं लागतो, त्याच्यावर कोणीं दोषारोप केला तर हा लगेच उसनें फेडतो, त्याच्या-

वर कोणीं हात टाकला तर तो दुप्पट जोरानें त्याचें उट्टें काढतो. माझ्याशीं लोक योग्य रीतीनें वागत नाहींत हेंच कुविचारी मनुष्याचें पालुपद असतें, आणि ह्मणून तो दुःख आणि सुडाची कल्पना यांच्या पूर्ण तडाक्यांत सांपडतो. त्याला सम्यक्ज्ञान नसल्यामुळें आणि बरें आणि वाईट यांमधील भेद कळण्याइतकी अक्कल नसल्यामुळें, आपल्या दुःखाचें मूळ आपल्या दुष्ट वर्तनांतच आहे, दुसऱ्याच्या दुष्कृत्यांमुळें आपणांला दुःख झालेलें नाहीं, याचें त्याला आकलन होत नाहीं.

सद्विचारी पुरुषाला 'आपण' आणि 'आत्महित' या विचारांची पीडा बाधूं शकत नाहीं, आणि दुसऱ्याच्या दुष्ट कृतीनें त्याचा चित्तक्षोभ अगर संताप होत नाहीं. "यानें माझें अकल्याण केलें," असा विचारच त्याच्या मनाला शिवत नाहीं. दुसऱ्याच्या दुष्ट कृतींचा परिणाम आपणांला भोगावा लागत नाहीं, जें कांहीं भोंवेल तें आपलें दुष्कृत्य, अशी त्याची पूर्ण समजूत असते. आपलें हिताहित आपल्याच हातीं आहे, आणि आपलें चित्तस्वास्थ्य नाहींसें करण्याला झालों तर आपले आपणच कारणीभूत होऊं, हें त्याला पूर्णपणें माहीत असतें. **आत्मैव आत्मनो बंधुः आत्मैव रिपुरात्मनः**" किंवा "**स्वकर्मसूत्रग्रथितोहि लोकः**" याची त्याला भरपूर जाणीव असते. सद्वर्तन हाच त्याचा आधार, हीच त्याची गति, आणि 'अपकार' करण्याची कल्पना त्याच्या हृदयास स्पर्श देखील करूं शकत नाहीं. त्याचें चित्तस्वास्थ्य कोणत्याहि गोष्टीनें तो ढळूं देत नाहीं, आणि उसनें फेडण्याची कल्पना त्याच्या-हृदयाचा भेद करूं शकत नाहीं. कोणत्याहि मोहाला तोंड देण्या-इतकी त्याची तयारी असते, आणि मोहाचे पाश त्याच्या अंतः-करणावर लागू होत नाहींत. सद्गुणाची कांस त्यानें बळकट धरली असल्यामुळें त्याला अभंग धैर्य आणि अखंड चित्तस्वास्थ्य मिळतें.

## श्रेयःसाधन.

सद्विचारी पुरुषाला सजीव आणि निर्जीव वस्तुजातांबद्दल आपली कोणत्या तऱ्हेची भावना असावी ही बिनचूक कळून तो तीप्रमाणें वर्तन करीत असतो; आणि ही भावना ह्मणजे सर्वत्र समदृष्टि होय. ही प्रवृत्ति ह्मणजे वैराग्य नव्हे, हें सम्यक्ज्ञान होय. ती भावना ह्मणजे उदासीनता नव्हे, तर पूर्ण जागरुकता होय. त्याला जीविताच्या आधारभूत गोष्टींचें पूर्ण ज्ञान झालेलें असल्यामुळें त्याचें भ्रमपटल दूर होऊन जगांतील वस्तु जशा आहेत तशाच दिसतात. आयुष्यांतील बारीकसारीक गोष्टींकडे तो दुर्लक्ष्य करीत नाहीं. परंतु सृष्टिनियमाप्रमाणें त्यांची संगति लावीत असतो आणि या अफाट विश्वाच्या रहाटगाडग्यांत त्यांचा कसाकसा संबंध आहे, हें त्याला स्पष्टपणें समजून येतें. विश्वाची घटना न्यायाच्या तत्त्वावर चालू आहे अशी त्याला पूर्ण जाणीव होते. लोकांच्या कलहांकडे तो कौतुकदृष्टीनें पाहतो; परंतु त्यांत सामील होत नाहीं. त्याला पक्षपात नाहीं. त्याची सहानुभूति सर्वांशीं सारखीच असते. '**समः शत्रौ च मित्रे च**' असें त्याचें वर्तन असतें. त्याची कृपा एकावर अधिक आणि दुसऱ्यावर कमी असें घडत नाहीं. "**तुल्यो मित्रारिपक्षयोः**" त्याचा सर्वत्र आत्मभाव जागृत झालेला असतो, आणि व्यक्तीमध्यें जसा सद्गुणाचा जय झालेला दृष्टीला पडतो, त्याच न्यायानें जगांत अखेर 'सत्'च विजयी होतें, आणि सद्गुणाचा विजय हा व्हावयाचाच. कारण पापप्रवृत्ति आपला आपण नाश करून घेत असते, हें त्याला पूर्णपणें कळतें.

'सत्'चा नाश नाहीं. '**नाभावो विद्यते सतः**' न्यायाला मरण नाहीं. मनुष्यानें काय वाटेल तें केलें, तथापि न्याय किंवा सत्य नाहींसें होत नाहीं. न्यायाला दूर करणें, किंवा त्याचा पाडाव करून 'असत्या'चा टेंभा कधींहि मिरवला जाणार नाहीं. न्यायाचें

सिंहासन इतकें दुर्भेद्य व दुर्जेय आहे, कीं, त्यावर हल्ला करणें देखील अशक्य आहे. मग तें पार उलथून टाकण्याचें नांव कशाला पाहिजे! आणि हेंच ज्ञान सद्विचारी पुरुषाच्या चित्तस्वास्थ्याचा आधारस्तंभ आहे. स्वतः धूत–किल्मिष झाल्यामुळें त्याची सर्वत्र समदृष्टि असते. त्याचें अंतःकरण प्रेममय झाल्यामुळें त्याला सर्वच आत्म्याचीं प्रतिबिंबें दिसतात, आणि दुष्ट विकार जिंकिले असल्या-मुळें सत्याचा त्याला सर्वत्र विजय झालेला दिसतो.

जो कोणाचा द्वेष करीत नाहीं, ज्याला अहंकाराची बाधा नाहीं, व जो विषयांपासून निवृत्त झाला, तोच खरा विवेकी पुरुष म्हटला पाहिजे, आणि अशाच मनुष्याला–दृष्टीचें अज्ञानपटल दूर झालें असल्यामुळें—जगाचें योग्य ज्ञान होतें. त्याचे कट्टे शत्रु देखील त्याच्या ठिकाणीं वैरभाव जागृत करूं शकत नाहींत. उलट शत्रू-बद्दल त्याच्या ठिकाणीं दया उत्पन्न होते. त्याला ज्या गोष्टींचें ज्ञान झालें नाहीं त्यांबद्दल तो वायफळ गप्पा मारीत नाहीं, आणि त्याच्या हृदयाला नेहमीं शांतिसुखाचा अनुभव घेतां येतो.

जेव्हां आपल्या मनांतील शत्रुभाव नाहींसा झालेला आहे, दुःखाचें मूळ राहिलेलें नाहीं, द्वेषबुद्धि पार मावळलेली आहे, आणि ज्या गोष्टी पूर्वी तिरस्करणीय वाटत होत्या त्याबद्दल प्रेमभाव जागृत होऊं लागला आहे, अशी मनाची प्रवृत्ति होऊं लागली म्हणजे समजावें, कीं, त्या मनुष्याचे विचार सत्यमार्गाला धरून चालले आहेत.

एखादा मनुष्य शिकलेला असेल; परंतु जर त्याला 'वस्तुविवेक' नसेल तर तो खरा विवेकी मनुष्य नव्हे. नुसत्या पुस्तकी ज्ञानानें मनुष्याची दुःखापासून मुक्तता व्हावयाची नाहीं; किंवा पुष्कळ अभ्यासानें दुःखशोकांपासून त्याची सुटका होणार नाहीं. केवळ

' आत्मजय ' केल्यानेंच सर्व आधिव्याधींचा परिहार होईल, आणि सद्वर्तनानेंच त्याच्या दुःखाचें निर्मूलन होईल.

नुसता हुषार किंवा पंडित किंवा नुसता आत्मविश्वासी मनुष्य यांनां श्रेयःसाधन करितां येईलच असें सांगवत नाहीं; परंतु शुद्धांःतःकरणाचे, सदाचारी आणि ज्ञानी अशा लोकांनां तें खात्रीनें साध्य होईल. पहिल्या तीन प्रकारच्या लोकांनां जगांतील व्यवहाराच्या त्यांच्या विवक्षित कार्यांत कदाचित् यशप्राप्ति होईल; परंतु दुसऱ्या तीन प्रकारच्या लोकांनां आपलें आत्यंतिक कल्याण—पारमार्थिक कल्याणरूपी मोठा विजय संपादन करितां येईल. तो विजय इतका पूर्ण, अविनाशी, आणि तेजस्वी आहे, कीं, त्याला कधींहि कमीपणा नाहीं आणि कमीपणा आला तरी त्याची महति वाढतच जाईल.

सद्गुण हे अढळ आहेत. सद्गुणांबद्दल भ्रम उत्पन्न होण्यासारखा नाहीं, किंवा सद्गुण नष्टहि होत नाहींत. ज्याचे विचार सत्याला धरून आहेत, जो सद्वर्तनानें चालतो, ज्याचें मन सत्यमार्ग सोडून जात नाहीं, तोच इहपरलोकीं उत्तम गति मिळवितो. '**आचारत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम्** ।' कारण सद्गुणाचा विजय झालाच पाहिजे, आणि सन्मार्ग व सत्य हे जगाचे आधारस्तंभ आहेत. **सर्वं सत्ये प्रतिष्ठितम्** ।

# शांति आणि उपायचिंतन.

ज्याची बाजू सत्य आहे तो अगदीं शांत असतो. ज्याचें मन शुद्ध आहे व जो सन्मार्गानें चालतो त्याला उतावीळपणा आणि क्षोभ, चिंता किंवा भीति हीं बाधूं शकत नाहींत. आत्मविजयानें अखंड शांति प्राप्त होते. शांतिमुळें इतर सद्गुणांचें तेज उद्दीपित होतें. एकाद्या अवतारी पुरुषाच्या मस्तकाभोंवतीं ज्याप्रमाणें तेजोवलय असतें, त्याप्रमाणें इतर सद्गुणांनां शांति तेजस्वी करते. मनुष्य कितीहि सामर्थ्यवान् असला, तथापि त्याच्या आंगीं शांति नसेल, तर तें सामर्थ्य ह्मणजे कमकुवतपणाची कमाल ह्मटली पाहिजे. ज्या मनुष्याची शांति यत्किंचित् बाह्यउपाधीनें भंग पावते त्या मनुष्याचें दैवी सामर्थ्य कोठें आहे ह्मणावयाचें ? दैवी सामर्थ्य राहूंद्या, पण नुसतें पौरुषबळ तरी कोठें आहे ? जो मनुष्य मोहाचा प्रसंग प्राप्त झाला असतां मन आंवरून न धरितां मोहाच्या आधीन होतो अथवा थोडासा बिकट प्रसंग प्राप्त झाला असतां व्यर्थ क्रोधाला चढतो, त्याला इतरांवर आपलें वर्चस्व कसें प्रस्थापित करितां येईल ?

सद्वर्तनी मनुष्य स्वतःवर दाब ठेवून विषयवासनांवर आणि मनोभावनांवर कडक नजर ठेवतात, आणि अशा रीतीनें त्यांचें मन त्यांच्या पूर्ण कह्यांत येऊन हलकेहलके त्यानां शांतपणाचा लाभ होतो, आणि जसजशी आंगीं शांति बाणेल तसतसें त्यांनां वर्चस्व, सामर्थ्य, मोठेपणा, शाश्वत आनंद आणि जीवितांचें साफल्य होऊन ते धन्य होतात.

ज्यांनां आत्मजय करितां येत नाहीं, जे इंद्रियें आणि वासना यांचे दास बनतात, आणि ज्यांनां सुखोपभोग आणि निषिद्ध सुख-

सेवन यांचा अगदीं ध्यास लागलेला असतो, त्यांची आयुष्याची इतिकर्तव्यता साध्य होण्याला अजून तयारी झाली नाहीं असें समजावें. त्यांनां शांतपणाची किंमत कळावयाची नाहीं, किंवा त्यांनां तो प्राप्त व्हावयाचा नाहीं. असे लोक तोंडानें शांतपणा पाहिजे ह्मणून ह्मणोत, परंतु त्यांच्या अंतःकरणावर कांहींएक परिणाम झालेला नसतो. आणि 'शांति' या शब्दाचा अर्थ त्यांच्या दृष्टीनें एका सुखामागून ' त्यांच्या इच्छेनें ' जें दुसरें सुखसेवन त्यानीं करावयाचें ठरविलें असेल त्याचा उपभोग घेणें तीच 'शांति.'

ज्याला शांति प्राप्त झाली त्याची पापाचरणाकडे प्रवृत्तीच होत नसल्यामुळें त्याला दुःख अगर पश्चात्ताप करण्याचा प्रसंग येत नाहीं. मूर्खपणानें हर्षातिशयाचा प्रसंग न आल्यामुळें दुःखकारक उद्वेगहि सहन करावा लागत नाहीं. हातून नित्यकर्म न घडल्यामुळें उद्वेग अथवा मानहानि भोगण्याचा प्रसंग येत नाहीं. पापाचरण, सुखाचा आनंद, दुःखाचा उद्वेग किंवा कुकर्म यांचा नाश होऊन केवळ 'सन्मार्ग' शिल्लक राहतो, व सत्याला नेहमीं शांतीचें आवरण आहे. शांतपणानें युक्त जें आयुष्य तें अखंड सुखाचा झरा होय. ज्याचें मन ताब्यांत नाहीं त्याला जीं कर्तव्यकर्मे त्रासदायक वाटतात तींच शांतिमान मनुष्याला आनंददायक वाटतात. शांतियुक्त जीवितक्रमामध्यें कर्तव्यकर्म या शब्दाला नवा अर्थ प्राप्त होतो. कर्तव्यकर्म ह्मणजे सुखविघातक कांहीं गोष्ट नसून सुखानुष्ठान अशीच त्याची व्याख्या होते. शांतचित्त मनुष्य, सद्विवेकी मनुष्य याला कर्तव्यकर्म ह्मणजेच आनंदप्राप्ति वाटते. कर्तव्यकर्म निराळें आणि सुखसेवन निराळें हा भेद सुखैषणा करणाराला आणि चैनी मनुष्याच्या दृष्टीला दिसतो.

## शांति आणि उपायचिंतन.

मनुष्यें मनावर उठणाऱ्या निरनिराळया क्षुद्र लहरी व त्यामुळें मिळणारें क्षणिक सुख याला अंधप्रवृत्तीनें चिकटून राहात असल्या-मुळें त्यांनां शांतपणा मिळणें कठीण जातें. क्वचित्प्रसंगीं दुःख भोगणें हीहि एक प्रकारची चैन आहे असें समजून लोक दुःखाची अपेक्षा करितात, किंवा जाणूनबुजून दुःख ओढून घेतात. शांतपणा हा मिळणें जरी दुर्घट असलें, तथापि तो प्राप्त करून घेण्याचे मार्ग सोपे आहेत. ते हे, कीं, ज्याच्या योगानें शांतीचा भंग होईल अशा गोष्टी सोडून देणें, आणि ज्या मनोवृत्तीच्या योगानें सद्गुणांवर अचल निष्ठा बसते व जे परिस्थिति आणि प्रसंगवशात् घडणाऱ्या गोष्टींनीं भंग पावत नाहींत व म्हणून ज्यांमुळें पश्चात्तापाचा प्रसंग येत नाहीं, आणि ज्यांच्या योगानें शाश्वत शांति आणि अखंड समाधान प्राप्त होतें, अशांचें चिंतन करणें होय. **निर्ममो निरहंकारः स शांति-मधिगच्छति.**"

जो आत्मजय करितो आणि नित्य अधिकाधिक आत्मजय, आत्मनिग्रह आणि चित्तशांति मिळविण्याचा प्रयत्न करितो, त्यालाच 'शांति' प्राप्त होते. प्रत्येक मनुष्य ज्या मानानें आत्मनिग्रह करील, त्या मानानें तो स्वतः सुखी व दुसऱ्याला आनंदरूप होईल, आणि असा 'आत्मजय' सतताभ्यासानेंच साध्य आहे. प्रत्यहीं प्रयत्न करून मनुष्यानें आपले दोष काढून टाकिले पाहिजेत. आपलीं व्यंगें काय आहेत तीं शोधून काढून आपल्या वर्तनांतून त्यांचें निर्मूलन करण्याचे मार्ग पाहिले पाहिजेत, आणि अशा रीतीनें हार न जातां तो जर प्रयत्न करील तर त्याला क्रमाक्रमानें त्या कामीं यश येईल; आणि या कामीं जरी थोडथोडी यशप्राप्ति होत गेली, तरी तितका कायमचा शांतपणा आंगीं बाणला असें होईल. अशा रीतीनें वागल्यास मनुष्य सामर्थ्यवान्, कार्यक्षम आणि सुखी होऊन आपलें

कर्तव्यकर्म यथायोग्य करून चित्तक्षोभ न होतां प्रत्येक प्रसंगाला तोंड देण्यास तत्पर होईल, आणि यदाकदाचित् अशा मनुष्याला या जन्मांत अभंग शांति प्राप्त झाली नाहीं, तथापि तो एकंदरींत यतचित्त व शुद्ध होऊन जीविताच्या संग्रामामधून धैर्यानें पार पडून या जगांत तो विद्यमान असतांना त्याच्या अस्तित्वामुळें जगाला मोठेपणा प्राप्त झाला होता, ही आठवण मागें ठेवून जाईल.

नेहमीं आत्मजय केल्यानें मनुष्याला स्वतःच्या स्वभावाची पुरी पारख होते, आणि याच दैवी ज्ञानामुळें मनुष्याच्या आंगीं शांति येते. आत्मज्ञानाखेरीज शाश्वत शांति प्राप्त होणें नाहीं, आणि जे लोक दुर्निवार मनोविकारांनां बळी पडतात त्यांनां शांतिसुखाचा प्रत्यय येणें दुस्साध्य आहे. ज्याच्यानें मनोजय होत नाहीं, असा दुर्बल मनुष्य तल्लख घोड्यावर स्वार होऊन त्याला मन मानेल तसें जाऊं देणाऱ्या स्वाराप्रमाणें होय. तोच निग्रही मनुष्य म्हटला म्हणजे अशा घोड्यावर आरूढ होऊन त्याला आपल्या कह्यांत ठेवून आपल्या इच्छेप्रमाणें वागविणारा व दामटणारा स्वार होय. "**इंद्रियाणां विचरतां विषयेष्वपहारिषु । संयमे यत्नमातिष्ठेद्विद्वान्यन्तेव वाजिनाम् ।**" असें मनूचें वाक्य आहे.

जो मनुष्य हळुहळू दैवी संपत्ति प्राप्त करून घेण्याच्या मार्गाला लागला आहे, अगर दैवी संपत्तियुक्त जाहला आहे, अशा मनुष्याच्या आंगीं पूर्ण शांति येणें ही दैवी संपत्तीची अगदीं उच्च पायरी होय. कारण, तो स्वतः शांत बनून इतरांनांहि शांतिसुखाचा लाभ देऊं शकतो. ज्यांचें मनोदौर्बल्य अजून गेलें नाहीं, व ज्यांचे संशय नष्ट झाले नाहींत, अशा मनुष्यांनां मनोद्वेगाच्या वेळीं शांति, गलितधैर्य झाल्या वेळीं धीर, आणि दुःखाच्या प्रसंगीं सांत्वन व हृदयाला आराम शांत मनुष्याच्या सान्निध्यानें प्राप्त होतात. कारण,

ज्यानें स्वतःचें दमन केलें तोच दुसऱ्याला मदत करण्याला समर्थ आहे. ज्याची स्वतःची तळमळ शांत झाली तोच हताश झालेल्याला धीर देऊं शकेल.

ज्याचें मनःस्वास्थ्य अनिष्ट प्रसंगांमुळें भंग पावत नाहीं, किंवा संकटांनीं, अथवा लोकांच्या निंदा, मिथ्यारोप, दूषणें अथवा विपर्यास यांनीं नाहींशी होत नाहीं अशी शांति दैवी सामर्थ्य प्राप्त झाल्याखेरीज यावयाची नाहीं, आणि अशा तऱ्हेच्या शांतीवरून त्या मनुष्याची आत्मज्ञानांत प्रगति किती झाली आहे याची कल्पना होते. शांत वृत्ति ह्मणजेच धीरोदार वृत्ति होय. ज्याच्यावर मिथ्या अपवाद आणि मानहानीचे प्रसंग येऊन देखील ज्याच्या मनाची शांति अगर गांभीर्य तिळप्रायहि ढळत नाहीं, तोच मनुष्य स्थिर बुद्धीचा व दैवी संपत्तियुक्त ह्मणावा. अशा प्रकारची जी शांति ती पूर्ण आत्मजयाचें फळ होय, व ती हजारों संकटें सोसून, मनाला शुद्ध करून, खडतर तपानें, मोठ्या कष्टानें व फारच सावकाश प्राप्त होते.

शांतिमान् मनुष्याला आपल्या सुखाचा व ज्ञानाचा उगम आपणांमध्यें असून तो कधींहि नाश पावणारा नाहीं, असें स्पष्ट समजून येतें. त्याच्या सर्व शक्ति त्याच्या ताब्यांत असून त्याला साधनांची कमतरता भासत नाहीं. त्यानें कोणत्याहि दिशेनें प्रयत्न केला तरी त्यांत त्याची योजकता व सामर्थ्य हीं दिसून येतात. याचें कारण सकल वस्तुमात्रांच्या गुणधर्मांचें—त्यांच्याबद्दल केवळ मतांचें नव्हे—योग्य आकलन झाल्यामुळें त्याची वागणूक सर्वांशीं यथान्याय असते. वस्तुमात्रांबद्दल जी त्याची कांहीं 'कल्पना' असेल, ती केवळ कल्पना आहे, खरें नाणें नव्हे; असें समजून तो त्यामुळें भुलून जात नाहीं. त्याचा अहंभाव पार नष्ट झालेला असल्यामुळें आणि सृष्टिनियमांनुसार वर्तणूक घडल्यामुळें सृष्टीशीं व अखिल

विश्वाशीं त्याचें तादात्म्य झालेलें असतें. त्याला ज्या साधनांचा उपयोग करावयाचा असतो त्यांत स्वार्थ म्हणून कांहीं रहात नाहीं, व त्याच्या उपाययोजनेंत 'अहंता' बिलकूल असत नाहीं. एका दृष्टीनें त्याचा 'स्वार्थ' सर्व गळालेला असतो. त्याचे सर्व सद्गुण हे देखील विश्वात्मभावयुक्त असतात, व त्यांचा त्याच्या देहादि विषयांशीं कांहीं संबंध रहात नाहीं. तो विश्वाचा एक सजीव अंश म्हणून पृथ्वीवर संचार करितो, आणि आतां तो पूर्वींचा क्षुद्र, कोत्या बुद्धीचा, स्वार्थांत गुरफटलेला माणूस राहिलेला नाहीं, आणि त्याचा आत्मभाव पार नष्ट झाला असल्यामुळें मीपणाला चिकटून असलेले लोभ, मोह, ईर्षा, असूया इत्यादि सर्व क्षुद्रभाव नाहींसे होतात. तो शांत वृत्तीनें वागतो आणि जें जें घडेल तें तें तितक्याच शांत-पणानें सहन करितो. तो कार्यक्षम व सत्याला धरून वागत असून कोणत्याहि कामांतील बारीकसारीक गोष्टींचें त्याला यथातथ्य ज्ञान झालेलें असतें. तो डोळे झांकून काम करीत नाहीं व कार्यसिद्धि होण्यास दैव अथवा कृपा यांचा कांहींएक उपयोग आहे, असें मानीत नाहीं.

शांत मनुष्याचें मन हें एकाद्या सरोवराच्या शांत पृष्ठभागा-प्रमाणें आहे. त्याच्यामध्यें जीवित व जीवितांतील यच्चयावत् गोष्टी यांचें यथातथ्य प्रतिबिंब पडतें. अस्वस्थचित्त हें पाण्याच्या चंचल पृष्ठभागाप्रमाणें आहे. त्याच्यामध्यें पडणारें प्रतिबिंब अस्पष्ट असतें. आत्मजय केलेल्या मनुष्याला आपल्या अंतःकरणाचें सूक्ष्म निरीक्षण केल्यावर आपण विश्वाचें अस्सल बरहुकूम प्रतिबिंब आहों, असें कळून येतें. आपण विराट पुरुषाची प्रतिमा आहों, व आप-णालाहि जगांतील न्यायाचा वांटा प्राप्त झालेला आहे. जग ज्या गोष्टी अन्यायाच्या व दुःखदायक समजतें ( व यालाहि पूर्वी तसेंच

वाटत होतें, ) त्या आपल्याच पूर्वार्जित कर्मांचीं फळें आहेत असें समजून येतें, व विश्वधर्मानुसार तीं भोगणें अथवा **'प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः'** या न्यायानें--त्या भोगणें त्रासदायक वाटत नाहीं. अशा रीतीनें त्याची शांति कधींहि भंग न पावतां ती त्याला निरतिशय आनंद आणि ज्ञान यांचें अखंड साधन होते.

ज्याचें चित्त स्थिर नाहीं अशा मनुष्याला ज्या कामांत यश यावयाचें नाहीं त्या कामांत शांतचित्त मनुष्याला यशप्राप्ति होतें. ज्याला आपल्या अंतःकरणांतील भयंकर खळबळीमध्यें जय मिळाला, व जो त्यांच्याशीं पूर्णतऱ्हेनें तोंड देऊं शकतो, अशाच मनुष्याला जगांतील संकटांना तोंड देतां येतें. ज्याला अंतर्जय साध्य झाला तोच बाह्यजय मिळविण्यास सर्वस्वी समर्थ आहे. शांतचित्त मनुष्याला संकटाची यथातथ्य कल्पना असते, व यांतून कशा तऱ्हेनें पार पडावें याचें त्याला पूर्ण ज्ञान असतें. अस्वस्थ मन ह्मणजे कर्तव्यमूढ मन होय. अस्वस्थ मनाला भांबावल्यासारखें होऊन आपलें संकट व त्याची भीति यापलीकडे त्याची दृष्टि जात नाहीं, आणि काय करावें हें त्याला समजत नाहीं, परंतु शांतचित्त मनुष्याची कोणत्याहि प्रसंगीं धांदल न होतां त्याची प्रत्युत्पन्न मति कलुषित होत नाहीं. कोणत्याहि गोष्टीनें तो घाबरून जात नाहीं, किंवा गैरसावध रहात नाहीं, अथवा कोणत्याहि गोष्टीनें त्याचें दृढनिश्चयी आणि घट्ट मन माघार घेत नाहीं. ज्या ज्या कामीं त्याची गरज लागेल, त्या त्या कामीं त्याचें सामर्थ्य दृग्गोचर होतें. तो जें जें काम हातीं घेईल त्या त्या कामीं त्याचें मन ममत्वबुद्धिरहित झालेलें असल्यामुळें—त्याची शांत आणि धीरप्रवृत्ति प्रत्ययाला येते. तो ऐहिक अथवा पारमार्थिक कोणतेंहि काम हातीं धरो, आपलें काम आपलें सर्व सामर्थ्य एकाग्र करून व अंतर्दृष्टियुक्त मनानें पार पाडील.

शांतपणा ह्मणजे मन व्यवस्थित होणें, व सर्वत्र समता भासणें होय. मनाच्या परस्परविरोधी व दुःखदायक प्रवृत्ति यांची एकवाक्यता होणें, आणि त्याचें एकच प्रमुख ध्येय असणें व त्या ध्येयाची व मनाची पूर्ण एकतानता होणें होय. तसेंच 'शांतपणा' ह्मणजे प्रमाथी इंद्रियें संयमित झालेलीं असून बुद्धि शुद्ध झालेली आहे आणि इच्छा सर्व शक्तिमान् ईश्वराच्या इच्छेंत विलीन झाल्या आहेत, अशी स्थिति होय. ह्मणजे याचा अर्थ असा, कीं, आत्मभाव पार मावळून जाऊन विश्वकुटुंबवृत्ति व भूयिष्ठहितपरता त्याच्या ठायीं पूर्ण जागृत झालेली असते.

मनुष्याच्या आंगीं शाश्वत शांति बाणेपर्यंत तो पूर्ण यशस्वी झाला असें ह्मणतां येत नाहीं. त्याची बुद्धि परिपक्व झालली नाहीं. सहजावृत्त्या त्याची चलबिचल होते, आणि त्याचें अंतःकरण विशुद्ध झालेलें नसतें. जोंपर्यंत मनुष्याची आत्मवंचना आणि आत्मश्लाघा सुरू आहे तोंपर्यंत त्याला श्रेयःसाधनाचा मार्ग साध्य व्हावयाचा नाहीं. आपलें पाप, आपलें दुःख आणि आपले परिताप हीं आपल्याच कर्मांचीं व आपल्याच अज्ञानावस्थेचीं फळें आहेत, ही गोष्ट त्याच्या मनावर पूर्णपणें बिंबली पाहिजे. आपल्या दुःखाचे उत्पादक आपण आहोंत. दुसऱ्यांशीं त्याचा संबंध नाहीं हें त्याला पुरेपूर समजलें पाहिजे. **'सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता। परो ददातीति कुबुद्धिरेषा। अहंकरोमीति वृथाभिमानः। स्वकर्मसूत्रग्रथितोहि लोकः।** हें त्यानें विसरतां कामा नये. धनलोभी मनुष्य ज्याप्रमाणें धनसंचयार्थ झटत असतो, त्याप्रमाणें शांतपणा आंगीं यावा ह्मणून मनुष्यानें मनःपूर्वक प्रयत्न केला पाहिजे, आणि थोडासा शांतपणा आंगीं आला ह्मणून त्यानें तेवढ्यानेंच संतुष्ट होतां कामा नये, ह्मणजे उत्तरोत्तर त्याच्या ठिकाणीं ज्ञान, सामर्थ्य, परमेश्वराची कृपा, समा-

धान व अखेर सर्वांनां उजाळा देणारी, पुष्पांच्या ताटव्यावर प्रातःकाळीं ज्याप्रमाणें दहिंवर पडावें तशी पूर्ण शांति प्राप्त होईल.

मन शांत झालें, कीं, तेथेंच सामर्थ्य आणि स्वास्थ्य, प्रेम आणि ज्ञान, हीं आलींच ह्मणून समजावीं. शांत मनुष्य ह्मणजे आत्मभावाबरोबर ज्याला खडतर संग्राम करावा लागला, व आपल्या दोषांबरोबर ज्याला खूप अंतस्थ टक्कर मारावी लागली व ज्याचा त्यांत अखेर जय झाला असा विजयी मनुष्य होय.

# अंतर्दृष्टि आणि उदार प्रवृत्ति.

मनुष्य सदाचरणाची इच्छा धरून त्यासाठीं प्रयत्न करीत असतां त्यांत असा वेळ येतो कीं, त्याला दैवी अंतर्दृष्टि प्राप्त होते. या अंतर्दृष्टीनें तो जगांतील कार्यकारणसंबंधाचा सूक्ष्म विचार करूं लागतो, आणि एकदां ती पूर्णपणें साध्य झाली म्हणजे तो मनुष्य सन्मार्गापासून कधींहि च्युत होत नाहीं, मोहाला बळी पडत नाहीं, आणि जगाच्या कल्याणाप्रीत्यर्थ हातीं धरलेल्या आपल्या उद्यमांत कोणालाहि हार जात नाहीं.

सद्गुणाभ्यासानें जेव्हां बुद्धि प्रगल्भ होते, तेव्हां सर्व दुष्ट प्रवृत्ति नाश पावतात, आणि हातून कुकर्म घडणें अशक्य होतें. प्रत्येक मनुष्याचें चारित्र हें कारण व कार्य यांची एक अखंड परंपरा आहे. असें पूर्ण ज्ञान झाल्यावर तो मनुष्य हातून सद्वर्तन घडावें अशीच इच्छा धरील. त्याची असन्मार्गाकडे प्रवृत्ति होणार नाहीं व आत्म-विषयक सर्व क्षुद्र विचार तो पार सोडून देईल.

मानवी जीवित ज्या सत्य सिद्धांतांनीं बद्ध आहे त्यांचें योग्य ज्ञान जोंपर्यंत मनुष्याला प्राप्त झालें नाहीं, तोंपर्यंत जरी त्यानें प्रसंगविशेषीं सद्वर्तन--सौंदर्य दाखविलें तरी त्याची प्रवृत्ति उदार झालेली नाहीं, त्याला अजून सात्त्विक भावाचें कवच प्राप्त झालें नाहीं, किंवा अंतिम साध्याचा पूर्ण आश्रय अजून त्यास मिळाला नाहीं, असें पक्कें समजावें. त्याला नित्यानित्यवस्तुविवेक, अथवा चांगल्याचें फळ चांगलें आणि वाइटाचें फळ वाईट, हें कळण्या-इतकी बुद्धीची कुशाग्रता अथवा अंतर्दृष्टि प्राप्त झालेली नसल्यामुळें,

ज्या विषयांत त्याचें मन दृढ झालेलें नाहीं त्या गोष्टींत तो मोहाला बळी पडतो, व त्याची पारमार्थिकदृष्टि अंधुक झालेली असल्यामुळें त्याला पूर्ण ज्ञान होत नाहीं. अशा रीतीनें त्याला गोते खावे लागल्यामुळें आपली पिछेहाट कां होते, याचें तो मग शोधन करूं लागतो, आणि आपल्या अपयशाचें कारण नाहींसें करून, सद्गुणांचें पूर्ण अनुष्ठान करून, अखेर त्याला ज्या योगानें मनुष्य देवपदवीप्रत पोहोंचतो अशा सृष्टीच्या सत्यस्वरूपाचें आकलन होऊं लागतें.

एकादा मनुष्य, त्याला सद्गुणाची खरी कल्पना नसूनहि तो किंवा, शुद्धांतःकरणी अथवा खंबीर मनाचा नसतांहि, विशेष परिस्थितीमुळें, किंवा मित्रांच्या साहचर्यामुळें, किंवा मन स्वैर जाण्यास अवसर न मिळाल्यामुळें, अथवा स्वभावतःच, सद्वर्तनी असेल आणि आपण शुद्ध वर्तनाचे आहों अशी घमेंडहि मारीत असेल; परंतु अशा मनुष्यावरील दडपण दूर झालें, किंवा ज्या बंधनामुळें तो स्वैर वर्तन करीत नव्हता तीं नष्ट झालीं, कीं, तो मनुष्य मोहपाशांत सांपडून त्याचें प्रच्छन्न मनोदौर्बल्य व दुर्गुणप्रवृत्ति हीं उपयाला आल्याखेरीज रहाणार नाहींत. उलट पक्षीं, जो खरोखरच सद्वर्तनी आहे, उगाच भिडेभाडेनें सद्वर्तन न करितां मनाला पटतें म्हणून जो सद्वर्तनानें चालतो, तो नेहमींच्या व्यवहारांत इतर चारचौघां-सारखा दिसेल. तथापि जेव्हां अकस्मात् एकादा मोहाचा प्रसंग उद्भवेल, किंवा कांहीं विशेष प्रसंग येऊन पडेल तेव्हां मात्र त्याचे गुप्त सद्गुण पूर्ण तेजानें आणि सामर्थ्यानें दृग्गोचर होतील.

अंतर्दृष्टीनें संकटाची भीति नष्ट होते, आणि सद्धर्माचा विजय होतो, ही खात्री पटते. ज्याला पूर्ण ज्ञान प्राप्त झालें त्याच्या हातून पापकर्म घडावयाचें नाहीं. कारण, सत्कृत्य आणि दुष्कृत्य यांचें सामर्थ्य त्याला समजतें, व वाईटाचे परिणाम किती भयंकर व

हजारों मार्गांनीं अधःपात करणारे आहेत, याची बालंबाल खात्री असल्यामुळें असन्मार्गाचें अवलंबन त्याच्यानें होत नाहीं. ज्याप्रमाणें उत्तम पक्कान्नें सोडून कोळसे खाण्याची इच्छा कोणीहि शहाणा मनुष्य करणार नाहीं, त्याचप्रमाणें ज्याची आध्यात्मिक बुद्धि जागृत झाली तो सत्प्रवृत्ति सोडून असत्प्रवृत्तीकडे कधींहि धांव घेणार नाहीं. मनाची पापाचरणाकडे प्रवृत्ति असणें हें अज्ञानाचें व भ्रमाचें फळ आहे. बुद्धीचें मोहपटल दूर झालेलें नसल्यामुळें व ती प्रगल्भ झालेली नसल्यामुळें 'सत्' आणि 'असत्' यांबद्दल मनाचा घोंटाळा उडून त्याची पापाकडे प्रवृत्ति होते.

मनुष्य सदाचरण करण्याला प्रयत्न करूं लागला असतां तो आपल्यावर मारा करणाऱ्या व दिसावयाला अजिंक्य अशा मनोविकाररूपी प्रबल शत्रूंवर आपलें शस्त्र धरतो; परंतु जसजसें त्याला ज्ञान प्राप्त होतें, सर्व ऐहिक गोष्टींच्या वास्तविक स्वरूपाचा त्याला यथार्थ बोध होतो, तसतसें असत्प्रवृत्ती ही दुर्बल, अशक्त आणि अज्ञानमूलक गोष्ट आहे, मोठी भयंकर शक्ति नव्हे, असें त्याला समजून येतें. ज्ञानी मनुष्याला, दुःखाचें बीज अज्ञान असून त्यामुळें सर्व मनस्ताप भोगावे लागतात, असें समजून चुकतें, व 'असत्' ह्मणजे 'सत्'चा अभाव, हें ज्ञान झालें ह्मणजे तो 'असत्प्रवृत्त' मनुष्याचा तिरस्कार न करितां उलट जे पापरत व दुःखी आहेत त्यांच्याबद्दल अनुकंपाच प्रगट करील.

ज्यानें आपली पापप्रवृत्ति खणून काढिली व पापप्रवृत्ति ह्मणजे काय व तिचा उगम कशांत आहे हें ज्याला पूर्णपणें समजलें तो मनुष्य दुसरा कितीहि सद्गुणभ्रष्ट झाला असला तरी त्याचा द्वेष, तिरस्कार अगर उपहास करणार नाहीं. दुसरा मनुष्य किती शीलभ्रष्ट झाला आहे हें समजून घेऊन व त्याची स्थिति अशी कशामुळें

झाली, त्याचें चुकलें कोठें, त्याची अध्यात्मिक अवनति कां होते, याचा छडा लावून त्याच्यावर दया करून तो त्याला सन्मार्गाला लावील; परंतु ज्याला अंतर्दृष्टि नाहीं असा मनुष्य अशा भ्रष्टाचा तिरस्कार व उपहासच करील. अंतर्दृष्टीनें मनुष्यमात्रांत प्रेम उत्पन्न होतें, आणि ज्ञानाचें फळ 'अनुकंपा' हें आहे.

स्वतःची चित्तशुद्धि झाल्यामुळें, आणि नेहमीं सद्वर्तन घडल्यामुळें, जें ज्ञान प्राप्त होतें, त्याची परिणतावस्था म्हणजे मनुष्याचें उत्तम शील बनणें ही होय. अशा रीतीनें उत्तम शील बनलें म्हणजे त्या ठिकाणीं करारीपणा आणि प्रेमळपणा वास करीत असतो, त्या मनुष्याची बुद्धि शुद्ध होते, त्याची इच्छाशक्ति सतेज असते, आणि अंतःकरण कोमल बनून त्या सर्वांच्या समुच्चयानें तो मनुष्य विवेकसंपन्न, सात्त्विक बुद्धीचा आणि पूर्णावस्थेप्रत पोहोंचलेला आहे असें दिसून येतें, व त्याच्या ठिकाणीं सर्वभूतानुकंपा, सहानुभूति, पावित्र्य आणि ज्ञान हीं वास करीत आहेत असें कळून येतें. अशा रीतीनें सद्वर्तनानें ज्ञान उत्पन्न होऊन त्या ज्ञानानें-अंतर्दृष्टीनें—सद्वर्तन स्थीर होतें, मनाची पवित्र आणि उदात्त अशा गोष्टांकडे प्रवृत्ति व आवड उत्पन्न होते, आणि अशा मनुष्याची लोक साधुकोटींत गणना करितात.

ज्याची सत्प्रवृत्ति अशा तऱ्हेची बनली आहे, कीं, जी बदलेल्या परिस्थितीबरोबर अथवा ज्याच्याशीं संबंध येईल अशा मनुष्याच्या वर्तनाला अनुसरून फिरत नाहीं, तो दैवी सामर्थ्यवान् झाला असें समजावें. त्यालाच परब्रह्माची ओळख होईल. आतां त्याला दुःखबाधा होणार नाहीं. कारण त्याचा संबंध दुःखाशीं राहिलाच नाहीं. त्याचे सर्व विचार 'सत्'—अविनाशी—अशा गोष्टींबद्दलच असतील. त्याला असें पूर्ण ज्ञान झालेलें असतें, कीं, सदाचाराबद्दल असलेल्या भ्रामक कल्पनामुळेंच मनुष्याच्या हातून दुष्कृत्य घडत असतें आणि

हें समजल्यामुळें कोणाहि व्यक्तीबद्दल द्वेष त्याच्या शुद्ध अंतःकरणाला बाधूं शकत नाहीं, तो विमत्सर होतो.

असा मनुष्य कितीहि कोनाकोपऱ्यांत पडलेला कां असेना, त्याचें जीवित प्रभावशाली असतें. कारण सद्वर्तन हीच जगांत मोठी तेजस्वी गोष्ट आहे, आणि तो विद्यमान असतां त्याचें श्रेष्ठत्व जरी लोकांनां समजलें नाहीं, तथापि असा मनुष्य मनुष्यजातांत संचार करितो हे मानवजातीवर मोठे उपकारच आहेत. सद्गुणप्रवृत्ति ही इतकी सामर्थ्यवान् आहे, कीं, जगाची भवितव्यता सज्जनांच्या हातीं भूतकाळीं होती, हल्लीं आहे आणि भविष्यकाळींहि असेल. सज्जन लोक हे मानवजातीचे मार्गदर्शक आणि उद्धारकर्ते आहेत. हल्लीं जगाची जी उत्क्रांति चालू आहे, त्यांत मानवजात मागें न ठेवतां तिची ते झपाट्यानें उन्नति करीत आहेत. याचा अर्थ कांहीं गूढ किंवा अद्भुत गोष्टींमध्यें जनतेची उत्क्रांति होत आहे असें नव्हे, तर व्यावहारिकदृष्टीनें ही उन्नत्ति होत असून ती त्यांच्या आदर्शरूप वर्तनक्रमानें आणि त्यांच्या सत्कृत्यांच्या तेजानें होत आहे. जे सत्त्वधीर पुरुष जगाच्या कल्याणासाठीं आपला देह झिजवीत आहेत, त्यांनां अप्रबुद्ध लोक चमत्कारकर्ते म्हणोत; परंतु असे लोक चमत्कारकर्ते नसून सद्वर्तनप्रसारार्थ झटणारे आणि सत्प्रवृत्तीचे दास होत.

जगावर दुष्ट प्रवृत्तीचा पगडा कधींहि नव्हता, सध्यां नाहीं आणि पुढेंहि असणार नाहीं. कारण दुष्कृत्यांचा जगावर फैलाव झाला म्हणजे जगाचें अस्तित्व लयाला गेलें असें समजावें. कारण ज्याप्रमाणें अंधकार म्हणजे प्रकाशाचा अभाव, त्याप्रमाणें दुष्कृति म्हणजे सत्कृतीचा अभाव होय; आणि प्रकाश–ज्ञान–यानेंच जगाचें धारण होत आहे. अंधकार–अज्ञान–याचें कार्य कांहींहि नाहीं. दुष्कर्म ही जगांतील अतिशय दुर्बल गोष्ट असून तिनें कोणताहि कार्यभाग

साध्य होण्यासारखा नाहीं. हें जग केवळ सत्प्रवृत्तीसाठीं चाललें आहे, एवढेंच नव्हे, तर विश्व ह्मणजे पूर्ण 'सत्' आहे, आणि दुष्कर्माच्यानें पल्ला गांठवत नाहीं व त्याला जय नाहीं.

अंतर्दृष्टि ह्मणजे सर्वत्र सत्याचा प्रकाश आहे, असें ज्ञान होणें होय, व त्याच प्रकाशानें सर्व गोष्टींचा पूर्ण बोध होतो. ज्याप्रमाणे सूर्यप्रकाशानें सकल वस्तूंचें यथार्थ ज्ञान होतें, त्याचप्रमाणें सत्याचा प्रकाश अंतःकरणांत पडल्यावर आयुष्यांतील सकल गोष्टींचें यथार्थ ज्ञान होतें. जो आपली दृष्टि अंतर्मुख करून सत्याच्या मदतीनें आपल्या हृदयाचें शोधन करितो, त्याला सर्वांच्या हृदयांचें ज्ञान होतें. ज्याला फार दिवसांच्या आत्मपरीक्षणानें सत्य नियमांचें आकलन झालें त्यालाच विश्वव्यापक व विश्वाच्या आधारभूत अशा ईश्वरी सूत्रांचें ज्ञान होतें. ज्ञानानें असन्मार्ग नाहींसा होऊन धर्मभोळेपणाचाहि लोप होतो. पापप्रवृत्ति ह्मणजेच असन्मार्गावलंबन. मनुष्ये एकमेकांच्या मतांवर हल्ला करितात, परंतु स्वतः अज्ञानांत रहातात. तथापि जेव्हां मनुष्यांची पापप्रवृत्ति सुटेल तेव्हांच त्यांना ज्ञानप्राप्ति होईल. पापप्रवृत्तीपासून धर्मभोळेपणा उद्भवतो. दृष्टि विकलित झाली ह्मणजे अज्ञानमूलक भ्रम उत्पन्न होतात. आणि अंतःकरण दुष्ट विकारांनीं भरून गेलेलें असल्यामुळें त्यांच्या दृष्टीला काल्पनिक राक्षसांची मोठी भीति व बाऊ वाटत असतो. परंतु जेथें शुद्ध ज्ञान झालें, तेथें भीति रहात नाहीं, आणि भुतेखेतें, क्रूर आणि तामसी दैवतें हीं केवळ मनुष्याच्या अज्ञानजन्य कल्पनांचीं फळें असून तीं त्यांच्या उत्पादक भ्रमासह, शुद्धचित्त मनुष्यांच्या तीक्ष्ण दृष्टीनें नाश पावतात, व अशा पवित्र झालेल्या मनुष्याला चोहोंकडे नयनमनोहर व नियमबद्ध विश्व दिसूं लागतें.

अंतर्दृष्टि उत्पन्न झालेला मनुष्य साधुसंतांच्या मोक्षदायक विचारसाहचर्यांत आपला काळ कंठीत असतो. केवळ क्षणिक अशी पवित्र-

पणाची लाट मनावर आली आणि लगेच नाहींशी झाली असें न होतां त्याचें मन सतत पवित्र विचारांत निमग्न असतें. आत्मभाव आणि दुःख यांतील त्याचा कंटाळवाणा लांबचा प्रवास संपलेला असून त्याला शांति प्राप्त झालेली असते. त्यानें अखेर जिंकिली असून तो पूर्ण आनंदी असतो. जगांतील पाप, विपत्ति आणि क्लेश हे इतर लोकांपेक्षां त्याला आतां स्पष्टपणें दिसून येतात. कारण, पूर्वीं तो स्वतः जेव्हां त्यांत गटंगळ्या खात होता तेव्हां त्याला जें ज्ञान नव्हतें, असे त्यांचे मूळ कार्यकारणसंबंध, त्यांचा परिपाक आणि फलप्राप्ति यांचा अन्योन्यसंबंध त्याला आतां पूर्ण समजत असतो. ज्याप्रमाणें एकादी अपत्यवत्सल माता आपल्या अर्भकाच्या जोगवणुकीची जीवेंभावें काळजी वाहते, त्याचप्रमाणें अज्ञानपंकांत रुतलेल्यांनां आणि दुःखशोकांत मग्न झालेल्यांनां प्रत्येक स्थित्यंतरांपासून ज्ञानसंपन्न आणि सुखी करण्यासाठीं तो मोठ्या कळवळ्यानें काळजी वाहतो.

सर्व जगाचे व्यवहार न्यायानें चालले आहेत, असें त्याला वाटत असतें. दुष्कृत्याचा बोलबाला होऊन त्याबद्दल मनुष्यांत जरी रणें पडत असलीं, तथापि ‘ असन्मार्ग ’ यशोलाभाला यावयाचा नाहीं; त्याचा नाशच होईल, अशी त्याची पूर्ण खात्री असते. सर्वव्यापी ‘सत्य’ हें जगाच्या नजरेला जरी आलें नाहीं, तरी तें अविनाशी आहे व सर्व विश्वावर त्याची पूर्ण सत्ता आहे असें तो समजत असतो. ‘सत्’ची थोरवी, श्रेष्ठता आणि सामर्थ्य अपार असून त्यापुढें दुष्कृत्य हें क्षुद्र, दुर्बल आणि तेजहीन आहे असें त्याला भासतें आणि याप्रमाणें एकदां भावना उत्पन्न होऊन प्रत्यय पटला ह्मणजे तो अखंड सत्कृत्यांत मग्न होतो. तो सत्याचा दास बनतो आणि सत्कृत्यांत रममाण होण्यांतच त्याला अत्यानंद वाटतो.

# अंतर्दृष्टि आणि उदार प्रवृत्ति.

हृदयांत अंतर्दृष्टीचा उगम झाला ह्मणजे सत्यस्वरूपाचा बोध होतो, व ही कांहीं अलंकारिक भाषा नसून, विश्व ह्मणजेच सत्य-स्वरूप, अथवा जें पिंडीं तें ब्रह्मांडीं अशी सर्वत्र प्रचीति येते. वस्तूचें स्थित्यंतर झालें, अथवा तिचा नाश झाला, तरी अंतर्दृष्टि प्राप्त झालेल्या मनुष्याला त्यापासून दुःख होत नाहीं. कारण, स्थित्यंतर झालें अथवा वस्तूंचा नाश झाला, तथापि अविनाशी ह्मणून कांहीं तत्त्व आहे असें त्याला ज्ञान झालेलें असतें.

या तत्त्वज्ञानामुळेंच साधुसंतांची उदारप्रवृत्ति अथवा अधिकार दिसून येतो, आणि त्याहूनहि उत्कट तऱ्हेनें, मनुष्यजातीचे जे मार्गदर्शक आहेत अशा महात्म्यांच्या ठिकाणीं हें ज्ञान वास करीत असतें, त्यांच्या ठिकाणीं विश्वात्मभाव पूर्ण जागृत असतो. त्यांनां जीविताचें साफल्य झालेलें दिसत असतें, आणि 'सत्यधर्म' काय आहे, हें समजून ते त्याप्रमाणें वर्तन करितात. आत्मजय केला असल्यामुळें त्यांचे सर्व मायामोह नष्ट होतात. दुष्ट विचारांचें दमन केलें असल्यामुळें त्यांचें दुःख पार मावळलेलें असतें. ते स्वतः पवित्र बनलेले असल्यामुळें त्यांनां चोहोंकडे पूर्ण ब्रह्म दिसतें.

जो सत्य, पवित्र, ऋजु मार्गाचें अवलंबन करून कितीहि विपर्यास, निंदा अगर आघात प्राप्त झाले तरी सत्पथापासून च्युत होत नाहीं, त्यालाच अखेर अंतर्दृष्टि प्राप्त होऊन सर्व जग सत्यमय दिसूं लागतें. मग त्याचें सर्व तप पूर्ण झालें असें समजावें. आतां त्याला कोणत्याहि गोष्टीचा ताप अगर दुःख होत नाहीं. पावित्र्य आणि आनंद यांची त्याला कायमची जोड मिळते, सत्याचा विजय झाला ह्मणून अखिल विश्वांत आनंद पसरतो, आणि सर्व जग अशा सत्पुरुषाचा मोठ्या आनंदानें जयजयकार करितें

# मनुष्याचें प्रभुत्व.

'आत्मभाव' किंवा 'मीपणा' जिंकल्यानंतर मनुष्याला एक प्रकारची कांहीं विशिष्ट जाणीव उत्पन्न होते, ही इतर नेहमींची 'प्रापंचिकबुद्धि' ह्मणजे जीमध्यें माझेंतुझें, बरेंवाईट व स्वार्थ यांचा खटाटोप असतो, आणि जीमुळें उद्वेग आणि विपत्ति हीं भोगावीं लागतात, तीहून भिन्न असून आपण हिला 'दैवी बुद्धि' ह्मणूं. हिचा फक्त मानवजात आणि विश्व, अविनाशी ध्येय, सन्मार्ग-चातुर्य आणि सत्य यांच्याशींच संबंध असतो. ती व्यक्तीचें सुख, संरक्षण आणि योगक्षेम यांची काळजी वहात नाहीं. त्यांच्याशीं तिला कांहीं कर्तव्य नसतें याचा अर्थ व्यक्तिविषयक सुख पूर्ण नाहींसें होतें असा नव्हे; परंतु त्यासाठीं लोलुप होऊन त्याच्याच मागें न लागतां त्याला विशेष महत्त्व दिलें जात नाहीं. ती शुद्ध मार्गगामी होऊन शुद्ध आचारविचार यांपासून आपोआप काय सुख लाभेल तेवढ्यांत संतुष्ट राहून, सुखोपभोग हीच इति-कर्तव्यता असें मानीत नाहीं. या दैवी भावनेमध्यें पाप आणि दुःख हीं शिल्लक रहात नाहींत. जीविताचें साफल्य कशांत आहे, व त्याचा खरा हेतु काय, याचें ज्ञान झालेलें असल्यामुळें पापप्रवृत्तीच समूळ नाहींशी होते, व त्यामुळें दुःखाचें कारण रहात नाहीं. 'जीजस' या स्थितीला 'परमेश्वराचें राज्य' असें ह्मणतो. बुद्ध त्याला 'निर्वाण' हें नांव देतो. चिनी तत्त्ववेत्ता, याला 'टाओ' ह्मणतो. इमर्सन याला 'परात्परात्मा' ह्मणतो, आणि डॉ. बर्क त्याला 'विश्वात्मभाव' ह्मणतो, आणि याच नांवाचा त्यानें एक उत्तम ग्रंथ लिहिला आहे.

## मनुष्याचें प्रभुत्व.

नेहमींची मनुष्याची बुद्धि ह्मणजे आत्मभाव अथवा मीपणा होय. 'मी'चा पगडा जेथें तेथें असावा, ही प्राणिमात्राची उत्कट इच्छा असते. या 'मीपणा'बरोबर अपार चिंता आणि संकटें पाठीस लागलेलीं असतात. आणि या 'मी'चा ह्मणजे देहाचा होणारा नाश ही दुःखाची परमावधि मानली जाते, आणि शरीर अमर असावें याच गोष्टीला प्राधान्य दिलें जातें.

परंतु दैवीज्ञान झाल्यावर ही सर्व चिंता पार लयास जाते. आत्मभाव नाहींसा होतो, व त्यामुळें देहाबद्दलच्या सर्व शंका आणि चिंता नाहींशा होतात. आणि सर्व वस्तुजातांचें यथार्थ ज्ञान झाल्यामुळें आपणास, त्यास जसें सुख अगर दुःख देतील अथवा हव्या अशा वाटतील त्याप्रमाणें न भासतां जशा आहेत तशा दिसतात.

अहंभावयुक्त मनुष्य हा वासनांचा दास बनतो; परंतु दैवीज्ञानयुक्त मनुष्य हा त्यांचा स्वामी आहे. पूर्वोक्त मनुष्य आपणास सुखावह अगर दुःखावह गोष्ट कोणती याचाच विचार करितो; परंतु अपरोक्त मनुष्य सुखदुःखाची पर्वा न करितां केवळ सत्यमार्गाकरितां आचरण करीत असतो.

सर्व मनुष्यजात आत्मभावांतून मुक्त होऊन दैवीज्ञानसंपन्न होत आहे. आत्मभावनेचें दास्य व त्याच्या साहचर्यानें असणारी पापवृत्ति व लज्जास्पद स्थिति यांतून सुटून शुद्ध आणि तेजस्वी अशा सत्यमार्गाचें अवलंबन करावें, अशी मनुष्यमात्राची पराकाष्ठा चाललेली आहे. महात्मे व अवतारी पुरुष यांस ही गोष्ट साध्य झालेली आहे. आत्मभावाच्या जाळ्यांत गुरफटल्यामुळें पूर्वी नानातऱ्हेचे जन्म त्यांनां घ्यावे लागले आहेत. परंतु आतां आत्मभाव नष्ट केल्यामुळें त्यांनां दैवीज्ञान प्राप्त झालें आहे. '**बहूनां जन्मनां अंते ज्ञानवान्मां प्रपद्यते**' असें वचन आहे. या मर्त्यभूमीवरील त्यांची उत्क्रांति

परिपूर्ण झाली आहे आणि आतां त्यांस पुनरपि आत्मभावयुक्त देह धारण करण्याचें कारण नाहीं. ते जीवनमुक्त होत. त्यांनीं आत्मजय केला ह्मणून त्यांस पूर्णज्ञान-ब्रह्मज्ञान झालेलें आहे. अशा ज्ञानी माहात्म्यांस लोक देवाप्रमाणें भजतात.कारण,त्यांचे ठायीं इतर आत्मभावयुक्त मनुष्याहून विशेष असें ज्ञान व सामर्थ्य दिसून येतें, व त्यामुळें त्यांचे आंगीं इंद्रियातीत सामर्थ्य आहे असें मानलें जातें. तथापि त्या व्यक्तिमध्यें कांहीं गूढ सामर्थ्य आहे असें नाहीं. आत्मभावाचा घोटाळा नाहींसा झाल्यामुळें त्यांच्या वर्तनाचा स्पष्टार्थ व सार्थपणा समजून येतो. त्यांच्या आचरणांतील रहस्य उलगडून जातें.

अशा महात्म्यांचे आंगीं असलेलें अखंड सौजन्य, अद्वितीय ज्ञान आणि पूर्ण शांती हीं अहंभावयुक्त प्राण्याच्या दृष्टीनें लोकोत्तर अशीं वाटतात;परंतु ज्याचा 'मी' पणा गळूं लागला आहे, व ज्यास दैवीज्ञान होत आहे, अशाचे ठिकाणीं हेच सात्विक भाव साहाजिक रीतीनें प्रादुर्भूत होऊं लागतात, आणि असें दैवी ज्ञान उत्पन्न होण्यासाठीं आत्मभावयुक्त मनुष्यानें पूर्ण सद्वर्तनानें आचरण केलें पाहिजे.

मनुष्यावर अंमल करणाऱ्या मनोविकारांचें ज्या मानानें प्रत्येकव्यक्ति दमन करील त्या मानानें त्या मनुष्याला दैवीज्ञानप्राप्ति, दैवी नम्रता आणि दैवी सामर्थ्य हीं प्राप्त होणार आहेत. ज्याला आत्मजय झाला तोच दैवी सामर्थ्यवान झाला. ब्रह्मज्ञान—आत्मज्ञान—झालेल्या मनुष्याचे आंगीं जी उदार प्रवृत्ति, परोपकाररत स्वभाव, आणि अव्यभिचारी सद्वर्तन हीं दिसून येतात, तीं आत्मजयाचीं फळें आहेत. आत्मभावयुक्त मनुष्य अंधप्रवृत्तीनें ज्या मनोविकारांचें दास्य करण्यांत धन्यता मानतो, तेच मनोविकार पूर्णपणें समजून घेऊन त्यांचें दमन करण्याचा—त्यांच्याशी तुंबळ युद्ध

करण्याचा अभ्यास ठेवल्याचा आत्मज्ञान हा साहजिक परिणाम होय. **" चणे खावे लोखंडाचे मग ब्रह्मपदीं नाचे."** 'मी'पणांत गुंतलेला मनुष्य ह्मणजे गुलामगिरींत खितपत पडलेला मनुष्य होय. तो आपल्या वासनांचा दास असतो, आणि षड्रिपु त्याचेवर अंमल करीत असतात. त्यानें षड्रिपूंनां मिठी मारलेली असल्यामुळें त्यांच्या पासून उत्पन्न होणारें दुःखहि त्याला भोगावें लागतें. आपण पापरत आहों, आणि त्यामुळें विपत्ती भोगाव्या लागतात, ह्याचीहि त्याला जाणीव असते; परंतु त्यांतून आपली सुटका करून घेण्याचा मार्ग त्याला दिसत नाहीं. ह्मणून मग तो कांहीं तरी तात्पुरता वेदांत सांगून पुढील आशेनें आपल्या मनाचें समाधान करण्याचा प्रयत्न करितो. परंतु अशा रीतीनें समाधान किंवा दुष्कर्मनिवृत्ती न होतां त्यास उत्तरोत्तर अधिक दुःख भोगावें लागतें.

परंतु आत्मज्ञान झालेला मनुष्य ह्मणजे सकल सृष्टीचा 'स्वामी' होय. तो 'सत्याचा' दास, 'अहंकारा'चा गुलाम नव्हे. तो आपल्या-वासनांचें दमन करून त्यांस युक्तमार्गगामी करितो, व त्यामुळें आपण दुःखशोकांपासून मुक्त होत आहों ही जाणीव त्याला भासूं लागते, आणि आत्मजयानें सर्व दुःखशोकांपासून आपण पूर्ण मुक्त होऊं असा त्यास प्रत्यय येतो. त्याच्या प्रयत्नांत बळकटी येण्यासाठीं त्याला तत्वज्ञानाची मदत लागत नाहीं. तो सन्मार्गाचरणांत अविरत रममाण होतो, आणि आपणांस आपल्या-प्रयत्नांत यश येत आहे असें समजून येऊन त्यास आनंद होतो आणि त्याचे ठिकाणीं अधीक पावित्र्य आणि सामर्थ्य हीं उत्पन्न होतात. ज्या वेळीं त्याला पूर्ण आत्मजय साध्य होतो तेव्हां सत्य मार्गास अनुकूल असतील तेवढ्याच त्याच्या इच्छा शिलक राहतात. ब्रह्मचिंतनाखेरीज अन्य विषय त्याचेजवळ उरत नाहीं. या वेळीं

तो आपल्या कर्मांचा स्वामी बनतो व त्यास कशाचेंहि दुःख रहात नाहीं.

अंतर्यामीं धुमाकूळ गाजविणारा असा दुर्जय अहंभाव नष्ट झाला म्हणजे तो मनुष्य शांत, सुखी, ज्ञानी आणि आनंदरूप बनतो. मग त्याला दुःखशोकाच्या माऱ्याची बाधा होत नाहीं. मानवसुलभ अशीं दुःखें व विपत्ति या त्याला पीडा करूं शकत नाहींत, व कोणचीहि दुःखदायक गोष्ट त्याच्यापर्यंत पोहोंचूं शकत नाहीं. तो दुःखशोकांपासून मुक्त होतो. दैवी गुणांचा पाठिंबा त्याला मिळाल्यामुळें कोणचाहि शत्रू त्याचा पाडाव करूं शकत नाहीं, किंवा कोणच्याहि शत्रूच्यानें त्याला उपद्रव करवत नाहीं. सत्वशील आणि शांत बनल्यामुळें, कोणचाहि मनुष्य अगर शक्ति किंवा देश त्याची शांति हरण करूं शकत नाहीं.

मनुष्याला आपल्या स्वतःशिवाय दुसरा शत्रू नाहीं. '**आत्मैव रिपुरात्मनः**' अज्ञानाहून दुसरें तिमिर–अंधार–नाहीं. आणि आपला देहसुलभ, उच्छृंखळ प्रवृत्तीमुळें उत्पन्न होणाऱ्या दुःखाखेरीज दुसरें दुःख नाहीं.

ज्याची आवडनिवड सुटली नाहीं, म्हणजे ज्याला आपपर हा भेद आहे, ज्याच्या ईषणा आणि उद्वेग नष्ट झाले नाहींत, वासना आणि नैराश्य लुप्त झालीं नाहींत, दुष्कर्म आणि शोक हीं नाश पावलीं नाहींत, तो अजून पूर्ण ज्ञानी झाला नाहीं, असें समजावें. या सर्व अवस्था आत्मभावांत गुरफटलेल्याच्या आहेत, व त्यांवरून मनुष्याचें अज्ञान, विकारबद्धता, दौबल्य आणि मूर्खपणा हीं दिसून येतात.

ज्याचें मन या प्रपंचांत राहून नेहमीं शांत, व सदोदित कोमल असतें, आणि जो नेहमीं धीर वृत्तीनें असतो, तोच खरा ज्ञानी मनुष्य होय. खरा ज्ञानी मनुष्य कशाचीहि इच्छा करीत नाहीं. कशाचेंहि त्याला

दुःख होत नाहीं. त्याला कशाचीहि आशा रहात नाहीं, किंवा त्याला नैराश्यहि वाटत नाहीं. परमेश्वरानें जसें जग उत्पन्न केलें आहे त्यांत त्याला दोष दिसत नाहीं. हीं सर्व चिन्हें 'आत्मज्ञान' झालेल्या मनुष्याचीं आहेत. ब्रह्मज्ञान झालेल्याचे हे सर्व सात्विक भाव आहेत, व त्यावरून त्यास ज्ञानप्राप्ति, सामर्थ्य आणि प्रभुत्व प्राप्त झालेलें आहे, असें समजावें. **'यो न कांक्षति न द्वेष्टि-ब्रह्म संपद्यते तदा'** **'निराशीर्यतचित्तात्मा'** इत्यादि वचनें आहेत.

ज्याची वित्तैषणा, सुखैषणा, लोकैषणा नष्ट झाल्या, जो आहे त्यांत संतुष्ट, आणि तेंहि नष्ट झालें म्हणून जो शोक करीत नाहीं, तो ज्ञानी म्हणावा. ज्याच्या ईषणा अनिवार आहेत, आहे त्यांत जो संतुष्ट नाहीं, आणि त्याचाहि नाश झाल्याबरोबर जो दुःख करूं लागतो तो मूर्ख, अज्ञानी समजावा.

मनुष्याची तयारी, त्यानें 'जेता' व्हावें अशी करून ठेविलेली आहे. त्यानें भूप्रदेश मिळविले म्हणजे परमेश्वराचा हेतु सफल झाला, असें होत नाहीं. त्यानें 'आत्मजय' केला पाहिजे. भूप्रदेश जिंकिल्यानें मनुष्य त्या प्रदेशाचा इहलोकींचा राजा बनतो; परंतु आत्मजयानें तो पारलौकिक राजा--परार्थजेता--होतो.

मनुष्यानें प्रभू व्हावें अशी त्याची योग्यता आहे. त्यानें अन्य जीवांवर जबरदस्ती करून आपला अंमल बसवावा अशी ईश्वरी योजना नसून, त्यानें आत्मजय करून आपल्या देहधर्माचा स्वामी-प्रभु--बनावें अशी परमेश्वराची इच्छा आहे. जोरजुलुमानें इतर मनुष्यांवर आपलें प्रभुत्व प्रस्थापित करणें ही अहंकाराची पराकाष्ठा होय, परंतु आत्मसंयमनानें आत्मजय करणें ही नम्रतेची परमावधी होय.

ज्यानें विश्वाच्या कल्याणाकरितां—सत्याच्या उत्कर्षाकरितां स्वार्थपरता दूर झुगारून दिली तोच पुरुषोत्तम—मनुष्यप्रभु—होय. त्यालाच

सर्व सिद्धि, अविनाशी सत्य गोष्टींची प्राप्ति झाली, असें समजावें. त्याला पूर्ण पुरुष एवढेंच नामाभिधान प्राप्त झालें, असें नव्हे, तर त्याला दैवी ज्ञानप्राप्तीहि झाली. तो नराचा नारायण झाला. त्याच्या मनाचें किल्मिष नाहींसें झालें व आयुष्यांतील दुःखांपासूनहि तो पूर्ण मुक्त झाला. तो सकल अवस्थातीत होय. तो सकल वस्तूंचा शांत अकर्मकृत द्रष्टा होय. त्यांचा असहाय दास नव्हे. आतां त्याचीं दुःख, शोक, चिंता, परिताप हीं सर्व लयाला जाऊन तो शुद्ध, आनंदी, अजरामर असा झाला आहे. तो सच्चिदानंद स्वरूपाप्रत गेला. त्याला जरामरणाचें दुःख व शोकाचें भय राहिलें नाहीं. जगांतील वडामोडींपासून अलिप्त राहून त्यांचें, तो शांत आणि आनंदयुक्त मनानें अवलोकन करितो. आतां त्याला मुक्ति मिळाली आणि त्याचें जन्ममरण हीं सुटलीं. तो त्यांचा स्वामी झाला.

# ज्ञान आणि विजय.

भक्ति ही श्रेय:साधनाची--विजयी जीविताची प्रथमपायरी असून ज्ञानसंपन्नता ही त्याची पूर्णावस्था होय. श्रद्धेनें मार्ग दिसतो, परंतु ज्ञान ही त्याची इष्टापूर्ति जाणावी. श्रद्धेचे मार्गात अपार कष्ट सोसावे लागतात. ज्ञानानें प्रेमभाव उत्पन्न होतो. श्रद्धा ही अंध-प्रवृत्ति परंतु विश्वासयुक्त स्थिति. ज्ञान हें पूर्ण जागरुकतेनें काम करणारें होय. श्रद्धेनें मनुष्य कर्म करूं लागतो. ज्ञानानें कर्माची फलप्राप्ति होते. इष्टापूर्ति होण्यासाठीं श्रद्धा अवश्य पाहिजे, आणि साध्य गोष्टीचें सार ह्मणजे ज्ञानप्राप्ति होय. श्रद्धा ही या भूतलावरील मनुष्य प्रवाशाची आधारयष्टि, आणि ज्ञान ह्मणजे त्याचा अखेरचा मुक्काम जाणावा.श्रद्धेशिवाय ज्ञानप्राप्ति नाहीं, आणि ज्ञानप्राप्ति झाली कीं श्रद्धेचे कार्य संपलें.

श्रेय:साधन करणें--विजयी जीवित होणें--ह्मणजे ज्ञानसंपन्न होणें, आणि ज्ञान ह्मणजे पुस्तकी विद्या, किंवा निरुपयोगी गोष्टींचें पाठां-तर नव्हे, तर जीविताच्या रहस्याचें ज्ञान होय. ज्ञानाखेरीज मनुष्याला विजयप्राप्ति नाहीं, ज्ञानाशिवाय स्थैर्य नाहीं, ज्ञानाशिवाय त्याच्या कष्टी हृदयाला शांति नाहीं. अज्ञान्याला, मूर्खाला ज्ञानाशिवाय गति नाहीं.पाप्याला शुद्धतेशिवाय मुक्ति नाहीं.शुद्ध आणि पवित्र आचरण केल्याखेरीज परमार्थज्ञान नाहीं, आणि परमार्थज्ञानप्राप्ति खेरीज संसारार्णवदु:खांतून सुटका नाहीं. चित्तशुद्धि झाल्याखेरीज शाश्वत शांति नाहीं, आणि चित्तशुद्धि व शुद्धाचरण हीं एकच होत.

परंतु अज्ञान्यालाहि ज्ञानप्राप्ति करून घेऊन मुक्त होतां येईल. दुराचारी मनुष्याला शुद्धि आहे. कारण त्यालाहि पवित्राचरण

करितां येण्यासारखें आहे. आणि ज्याला ज्याला ह्मणून इच्छा आहे मग तो श्रीमंत वा दरिद्री असो, विद्वान अगर अविद्वान कसाहि असो, नम्रपणें शुद्धाचरण करून, ज्ञानप्राप्ति करून घेऊन प्रत्येकाला भवसागरांतून तरून जातां येईल; आणि बद्ध झालेल्यांनां मुक्ति आणि निरुत्साहि झालेल्यांनां जय आहे, या भावनेनें स्वर्गीय आनंद होत असून सकल विश्वहि त्या आनंदांत मग्न होतें.

ज्ञानवान् मनुष्यानें आत्मजय केला असल्यामुळें त्याला दुराचरण, विपत्ति आणि संसारतापत्रय यांचेवरहि विजय मिळवितां येतो. दुःखशोकान्वित मनस्थिति जाऊन त्याला शुद्धि आणि शांति यांहि श्रेष्ठ झालेल्या मनस्थितीचा लाभ होतो. जुन्या ‘ पापमय ’ जगांतून अंतर्धान पाऊन नव्या सुखमय, निरुपाधिक, नियमबद्ध व ज्या ठिकाणीं मृत्यूचें भय नाहीं अशा जगांत त्याचा पुनर्जन्म झाला असें वाटतें.

ज्ञानवान् मनुष्याच्या सृष्टींत चिंता, शोक, परिताप, निराशा, दुःख, उद्वेग यांस अवसर नाहीं. अहंकारयुक्त प्राण्याच्या सृष्टींत या भावनांनां छायारूप अस्तित्व असतें; परंतु ज्ञानाचा प्रकाश फांकल्याबरोबर या छाया पार दिसेनाशा होतात. मनुष्याचें दुःख हें त्याच्या अज्ञानावस्थेचें, असंस्कृत मनाचें फळ आहे. पदार्थाला जशी छाया त्याप्रमाणें अहंभावाबरोबर दुःख जडलेलें आहे. जेथें दुराचारप्रवृत्ति आहे तेथें त्याचें अस्तित्व आहे. स्वार्थप्रवृत्तीमध्यें शांति नाहीं. तेथें ज्ञानप्रकाश नाहीं. आणि जेथें त्रासदायक षड्रिपु आणि अहर्निश पोळणाऱ्या वासना प्रबल आहेत तेथें ज्ञानाचा आणि शांतीचा आनंददायक वारा पोहोंचूं शकत नाहीं.

निर्भयपणा आणि निष्ठा, सुख आणि चित्तस्वास्थ्य, समाधान आणि संतोष,आनंद आणि शांति हीं ज्ञानी मनुष्याची अविनाशी संपत्ति

असून ती शमदमादि साधनसामुग्रीनें, सदाचरण आणि पवित्र वर्तनाच्या विनिमयानें प्राप्त होणारी आहे.

शुद्ध आयुष्यक्रमाचें फळ ज्ञान हें होय, आणि ज्ञानाचा अंतरात्मा शांति होय. जीविताचा खरा हेतु काय आहे—केवळ स्वार्थी हेतु भासतो तो नव्हे—याचा परिपूर्ण बोध होणें ही गोष्ट 'आत्म-विजय' करण्यास अत्यंत आवश्यक आहे. तसेंच आयुष्यांत घडणाऱ्या बारीकसारीक गोष्टींबद्दल दुःखशोक न करितां, कोणच्याहि गोष्टीनें शांति ढळूं न देणें, अशीहि मनाची तयारी झाली पाहिजे. म्हणजे आत्मविजय साध्य होईल.

ज्याप्रमाणें अध्ययन पूर्ण झालेल्या विद्यार्थ्याला अपुऱ्या किंवा चुकीच्या पाठामुळें त्रास होत नाहीं, किंवा गुरुकडून उपहास अथवा शिक्षा भोगावी लागत नाहीं, तसेंच सद्गुणचिंतनांत प्रवीण झालेल्या मनुष्याला, सद्वर्तनी झाल्याला, चुकीचें अथवा असन्मार्गानें कर्तव्यानुष्ठान झाल्यामुळें उत्पन्न होणारीं दुःखशोकादि भोगावीं लागत नाहींत, आणि तो त्यांच्या तापापासून सर्वस्वी मुक्त होतो.

अध्ययन पूर्ण झालेल्या विद्यार्थ्याला आपल्या बुद्धीबद्दल शंका किंवा अविश्वास असत नाहीं. आपल्या बुद्धीचें जाड्य त्यानें घालविलेलें असतें. त्याला पूर्ण ज्ञानप्राप्ति झालेली असते, आणि आपण ज्ञानसंपन्न आहों ही जाणीव त्यास असते, आणि त्याला अशी जाणीव असण्याचें कारण हें, कीं, बुद्धीला नाना तऱ्हेचे व्यासंग घडून व बुद्धीची परोपरीनें कसून परीक्षा होऊन अखेर त्याला कडक तपासणींतून पार पडावें लागतें, व त्यांतून तो यशस्वी झालेला असतो. म्हणून त्याला आपल्या ज्ञानसंपन्नतेबद्दल शंका घेण्याचें प्रयोजन रहात नाहीं. उलट, त्याचें ज्ञान अजमावण्यासाठीं जसजशी कडक परीक्षा घ्यावी, तसतसा त्याला विशेष आनंद होतो. तो पूर्ण सामर्थ्ययुक्त, आत्मविश्वासी आणि आनंदी असतो.

याच वरील दृष्टांताप्रमाणें सदाचारी पुरुषाला आपल्या भवितव्यतेबद्दल कधींहि शंका अगर भीति वाटत नाहीं. त्याच्या हृदयाचें अज्ञान त्यानें घालविलेलें असतें. त्याला ज्ञानप्राप्ति झालेली असते, आणि ज्ञानप्राप्ति झाली आहे अशी त्याला जाणीव असते. आणि पूर्वी लोकांच्या दुर्वर्तनाचा परिणाम आपणांवर घडत होता आपण त्याला बळी पडत होतों, परंतु आतां लोकांच्या कडक निंदा आणि मानहानीच्या शब्दांनीं आपलें स्वास्थ भंग पावत नाहीं, यामुळें आपण खरोखर ज्ञानी झालों आहों याची सत्यता त्याच्या अनुभवास येते.

सत् आणि असत् यांच्यामधील भेद समजणें आणि दुसऱ्याच्या दुष्कृत्यापासून उद्वेग न होणें ही सद्वर्तनी मनुष्याच्या दैवी सामर्थ्याची खूण होय, आणि हा वस्तुविवेक होणें हीच परमार्थज्ञानाची पराकाष्ठा आणि विजय होय. अशी स्थिति प्राप्त झाल्यावर दुसऱ्यांच्या कृतीनें त्याला तापत्रय होणार नाहीं, व त्याच्या हृदयाचा शांति हिराविली जाणार नाहीं. सत्कर्मानुष्ठान हीच त्याची गति, हेंच त्याचें आश्रयस्थान बनल्यामुळें दुःखभावना त्यापर्यंत पोचून त्याला अपकार करूं शकत नाहींत. तो अपकारांची फेड उपकारांनीं करितो, आणि दुष्कर्मापासून होणाऱ्या त्रासाचें सत्कर्माच्या सामर्थ्यानें परिमार्जन करितो.

दुष्कर्मांत रत झालेल्या मनुष्याला नेहमीं वाटत असतें, कीं, दुसऱ्याचीं दुष्कर्मे प्रबळ असून तीं आपणाला इजा करतील आणि त्यांचा सर्व रोख आपणांवरच आहे. या कल्पनेमुळें त्याला अतीशय दुःख आणि पीडा हीं होत असतात. परंतु त्याला आपल्या स्वतःच्या दुष्कर्माचें मात्र इतकें भय वाटत नाहीं. कारण ज्याचीं त्याला तीं दिसत नाहींत. तो अज्ञानांधःकारांत कुचंबत असल्यामुळें

त्याला अध्यात्मिक ज्ञान, किंवा सद्वर्तनाचा धीर अथवा शाश्वत शांति हीं मिळणें दुस्साध्य आहे.

ज्यानें ' आत्मजय ' संपादिला आहे तोच खरा ज्ञानी–सिद्ध पुरुष होय. सिद्ध पुरुष म्हणजे भुतेंखेतें उठविणारा अथवा चमत्कार करणारा नव्हे. कारण हीं सर्व अज्ञान आणि भ्रम यांची फळें होत. जीविताचा खरा हेतु जाणणाराला जीविताचे ऐहिक आणि पारमार्थिक रहस्याचें ज्ञान असतें. त्याची विश्वात्मदृष्टि जागृत झालेली असते. विश्वाचे नियम, विश्वप्रेम आणि विश्वाचें स्वातंत्र्य यांचें त्याला पूर्ण आकलन होतें. त्याची संकुचित वृत्ती नाश पाऊन विश्वकुटुंबवृत्ति जागृत होते.

जो अध्यात्मिक ज्ञानसंपन्न आणि विजयी मनुष्य झाला त्याची स्वार्थपरतेचीं दुष्ट स्वप्नें नाहींशीं होतात त्याला दिव्य दृष्टी प्राप्त होऊन सकल विश्व नवीन ऐश्वर्ययुक्त आणि तेजस्वी दिसूं लागतें. त्या सिद्ध पुरुषाला अक्षय शांति प्राप्त होऊन त्याची परमेश्वराचें ठिकाणीं अत्यंत निष्ठा आणि सर्वांबद्दल पूर्ण प्रेमभाव जागृत होतो. त्याच्या सर्व काम्य इच्छा लुप्त होतात. क्षुद्र हेतु आणि स्वार्थपर असे लोभद्वेष नष्ट होतात, आणि अशा रीतीनें त्याची उन्नति झाल्यामुळें जगाचे व्यवहार नियमबद्ध चालले आहेत याचा त्यास बोध होऊन भयसीमा जो मृत्यु त्याचें त्यास कांहींच भय वाटत नाहीं. तो मृत्यूचे दुःख मानीत नाहीं, तो दुःखशोकातीत असतो. याचें कारण तो उदास अगर दुष्ट झालेला असतो असें नसून त्याची स्वविषयांपासून आत्यंतिक निवृत्ति आणि जनतेच्या कल्याणाची अत्यंत आसक्ति हें होय. हेंच त्याचें हेतुसर्वस्व असतें. स्वविषयक बुद्धि समूळ नष्ट झालेली असल्यामुळें त्याचें दुःखहि नाश पावतें. आपणांला कांहीं प्राप्त झालें तरी उत्तम; आपल्याजवळून नाहीसें झालें तरीहि उत्तम ! अशी त्याची भावना असल्यामुळें, तो नेहमीं

शांत असतो. दुःखभावनेला त्यानें प्रेमभावाचें रूप दिलें असल्यामुळें त्याचें हृदय पराकाष्ठेचें कोमल होऊन सर्वांभूतीं दया त्याचे ठिकाणी वास करिते. त्याचें सामर्थ्य परपीडक, महत्वाकांक्षी आणि ऐहिक विषयमग्न नसून, तें शुद्ध, शांत आणि स्वर्गीय असतें, आणि जगाच्या कल्याणाकरितां कठोरता केव्हां धरावी आणि नम्र केव्हां व्हावें हेंहि ज्ञान गुप्तपणें त्याचे ठिकाणीं वसत असतें. तो जरी मितभाषी असला तरी तो जगाचा 'गुरु' आहे, जगाचा 'स्वामी आहे. यद्यपि तो आपला अधिकार गाजविण्याची आकांक्षा धरीत नाहीं. तो जेता आहे तथापि तो आपल्या बांधवांवर अंमल गाजविण्याची इच्छा बाळगीत नाहीं. विश्वाचा व्यापार अनियंत्रित चालावा म्हणून तो त्याचें एक चैतन्ययुक्त साधन बनून रहातो, आणि मानवजातीच्या उद्धारार्थ शुद्धांतःकरणानें आणि ज्ञानपूर्ण हृदयानें प्रयत्न करीत असतो,

अशा या नवयुगारंभीं ही आनंदाची वार्ता सर्व लोकांस पुनः एकदां विदित होऊंद्या, कीं, या युगांत पाप्यांनां शुद्धि, दुःखितांला आनंद, गलितधैर्य झालेल्यांनां धीर आणि पराभूत झालेल्यांनां विजय-प्राप्ति हीं मिळणार आहेत. हे मानवा! तुझें अंतःकरण जरी पापानें कलुषित झालेलें आहे, भिन्नभिन्न वासनांनी जरी तें छिन्न-विच्छिन्न होत आहे, तरी त्यामध्यें एक निर्भय जागा, सामर्थ्याचें केंद्र आहे. सर्वैश्वर्यसंपन्न सद्भाव--सच्चिदानंद प्रभूचें तूं निवासस्थान आहेस आणि 'जया'चा राजदंड तुझी मार्गप्रतीक्षा करीत आहे. **ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति**'तुझी सद्विचारबुद्धि हीच तुझ्या स्वानंदसाम्राज्याची राजधानी होय. तस्मात् हे दुःखी मानवा! ऊठ, जागा हो, आपल्या राज्यावर अधिष्ठित हो.

**शांतिः शांतिः शांतिः**

# मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीनें
## प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें.

---

### कादंबऱ्या, संपूर्ण गोष्टी वगैरे.

| | |
|---|---|
| संसार असार. | १-८-० |
| माणिकबाग. | १-४-० |
| दुःखाअंतीं सुख. | १-४-० |
| आजपासून पन्नास वर्षांनीं ! | १-४-० |
| केवळ स्वार्थापायीं. | १-४-० |
| नशिबाची परीक्षा. | १-४-० |
| दोन घटका मनोरंजन. (भाग १ ला) | १-४-० |
| दोन घटका मनोरंजन (भाग २ रा) | १-४-० |
| स्वामी पुंडभट. | १-४-० |
| सुधा. | १-०-० |
| संसाररंजन. | १-०-० |
| नरेन्द्रनाथ. | १-०-० |
| नवयुग. | ०-१२-० |
| जीवनसंध्या. | ०-१२-० |
| राजा तोडरमल. | ०-१२-० |
| बकुलमाला. | ०-१२-० |
| लीला. | ० १२-० |

| | |
|---|---|
| सरस्वती. . . . . . . . . . | ०-१०-० |
| सुशिक्षित स्त्री. . . . . . . . . | ०-१०-० |
| प्रियंवदा. . . . . . . . . . | ०-८-० |
| धाकट्या सूनबाई. . . . . . . . | ०-८-० |
| मृणालिनी. . . . . . . . . . | ०-८-० |
| परिणामीं हेंच! . . . . . . . . | ०-८-० |
| मूर्तिमंत देशाभिमान. . . . . . . | ०-८-० |
| संसारांतल्या गोष्टी. . . . . . . . | ०-६-० |
| अमृतपुलिन. . . . . . . . . . | ०-६-० |
| गरीब बिचारी यमुना. . . . . . . | ०-६-० |
| सेलिमा बेगम. . . . . . . . . | ०-४-० |
| रमा आणि माधव. . . . . . . . | ०-४-० |
| मुरारराव. . . . . . . . . . | ०-४-० |
| भयकर सूड. . . . . . . . . . | ०-४-० |

## नाटकें, प्रहसनें वगैरे.

| | |
|---|---|
| संगीत सुंदरमाधव. . . . . . . . | ०-१०-० |
| मालतीमाधव. . . . . . . . . | ०-८-० |
| मुद्राराक्षस. . . . . . . . . . | ०-८-० |
| महाराणा संग्रामसिंह. . . . . . . | ०-८-० |
| गौप्यगोपन. . . . . . . . . . | ०-८-० |
| विचारविलसित. . . . . . . . . | ०-८-० |
| द्रोणसंकोप. . . . . . . . . . | ०-६-० |
| रावबहादुर पर्वत्या. . . . . . . . | ०-६-० |

| | |
|---|---|
| चतुरगडच्या विनोदी स्त्रिया. | ०-६-० |
| भ्रमनिरसन. | ०-६-० |
| पन्हाळगडचा किल्लेदार. | ०-४-० |
| वेड्यांचें इस्पितळ. | ०-३-० |
| नीलांबरी. | ०-३-० |

## पारमार्थिक, चारित्रात्मक वगैरे.

| | |
|---|---|
| न्या. मू. रानडे यांचीं धर्मपर व्याख्यानें. | १-८-० |
| आमच्या आयुष्यांतील आठवणी. | १-४-० |
| स्वामी रामतीर्थ, ( भाग १ ला. ) | १-४-० |
| स्वामी रामतीर्थ, ( भाग २ रा. ) | १-४-० |
| श्रीरामकृष्ण. | १-४-० |
| डा. आनंदीबाई जोशी. | १-४-० |
| बोधपर व्याख्यानें. | १-०-० |
| राजा राममोहन राय | ०-१२-० |
| श्रीरामकृष्णांचीं बोधवचनें. | ०-८-० |
| ऐतिहासिक स्त्रिया. | ०-८-० |
| स्वामी विवेकानंद. | ०-४-० |

## कविता, पद्यग्रंथ वगैरे.

| | |
|---|---|
| अंतर्गृहांतील गीतें. | ०-६-० |
| कुसुमगुच्छ. | ०-४-० |
| दासबोधांतील उपदेशपाठ. | ०-४-० |

## विनोदात्मक.

| | |
|---|---|
| नाटक्याचे तारे. . . . . . . . . | ०-१२-० |
| भद्रंभद्र. . . . . . . . . . . | ०-१० ० |

---

## बाहेरील पुस्तकें.

| | |
|---|---|
| जगाचा प्रवास. . . . . . . . . . | १-४-० |
| वधूपरीक्षा नाटक. . . . . . . . | १-०-० |
| मतिविकार नाटक. . . . . . . . | १-०-० |
| अविचाराचा परिणाम. . . . . . . | १-०-० |
| सुविचारविजय नाटक. . . . . . . | ०-८-० |
| रानडे यांच्या चरित्राचें खरें स्वरूप. . . . | ०-४-० |
| वनवासी फूल. . . . . . . . . . | ०-३-० |

हीं सर्व, आणि यांशिवाय बाहेरचीं बहुतेक पुस्तकें खालील पत्त्यावर विकत मिळतील.

**मनोरंजन ऑफिस, गिरगांव—मुंबई.**